भारत-इतिहास-संशोधक-मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र. ६०

# ऐतिहासिक
# संकीर्ण निबंध खंड १ ला

संपादक व प्रकाशक—
गं. ना. मुजुमदार,
चिं. ग. कर्वे,
चिं. ब. जोशी,
चिटणीस–भा. इ. सं. मंडळ, पुणें

शक १८६५ आश्विन ]     किंमत १॥ रुपया     [ इ. १९४३ आक्टो.



मुद्रक
विठ्ठल हरि बर्वे,
आर्यभूषण मुद्रणालय, ९१५।१ शिवाजीनगर, पुणें ४

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-पुरस्कृत-ग्रंथमाला

(१) मठगांवचा शिलालेख (पृ. २४३– रा. ब. बांबर्डेकर. रु. २ व रु. १०१४)
(२) पर्णालपर्वतग्रहणाख्यानम् (पृ. ५०–कै. स. म. दिवेकर. रु. ०१० व ०८)
(३) श्री शिवभारत (मूळ व मराठी भाषांतर–पृ. ५८९ मूल्य रु. ६ व ५०१२)
(४) शिवचरित्रप्रदीप (पृ.३२५–कागदी व कापडी. रु.३॥ व ४ आणि रु.३।व३॥)
(५) हिंदी शिल्पशास्त्र भाग १ ला. (पृ. २००–कै.रा. सा. कृ.वि.वझे रु.३ व रु.२)
(६) शिवकालीन जंत्री शके १५५१–१६५० (पृ. २००–कै. ग. स. खरे रु. ५)
(७) साधन–चिकित्सा (पृ. ३२०–वा. सि. बेन्द्रे. रु. ३॥ व रु. ३)
(८) ऐतिहासिक पोवाडे (पृ. ६१५–य. न. केळकर. रु.३ व रु. २॥)
(९) वाठारकर निंबाळकर–इतिहास (पृ. ३०० रु. १॥ व १०३०३)
(१०) भूतेश–आख्यान (पृ. ७५. ०१२ व ०१०)
(११) कन्हाड, (पृ. ५४–श्री. य. रा. गुप्ते, बी. ए.०८)
(१२) ऐतिहासिक प्रस्तावना (पृ. ६००–कै. वि. का. राजवाडे रु.३ व २०६ ०६)
(१३) राजवाडे यांचे संकीर्ण निबंध (पृ. २९१ श्री.शं. ना. जोशी रु. २ रु.१॥)
(१४) राजवाडे संकीर्ण निबंध भाग ३ रा. (पृ.२८० श्री. शं. ना.जोशी २व१०१४)
(१५) (१६) प्रकाशित व्हावयाचे आहेत.
(१७) पुरंदरे–दप्तर, भाग २ रा. उत्तर पेशवाईतील पत्रव्यवहार (रु. ३ व रु. २॥)
(१८) The Escape of Shivaji from Agra (रावसाो देशपांडे–रु.३ व २॥)
(१९) लोककथा, पुस्तक १ लें (शं. ग. दाते कापडी, कागदी रु.१॥ व रु.१, १। व ०१४)
(२०) पानसे घराण्याचा इतिहास (कै. रा. ब. पानसे रु. ३ व रु. २॥)
(२१) कै. वासुदेवशास्त्री खरे–चरित्र (श्री. दा. मो. भट रु. २॥ व रु.२।~)
(२२) लोककथा भाग २ रा. (पृ.८०–श्री. शं.ग. दाते रु.१०८ व १०४ व १०४व०१४)
(२३) संपूर्ण भूषण (पृ. २३०–श्री. रा. गो. काटे–रु. १०८ व १०४)
(२४) शिवचरित्रसाहित्य खंड ३ रा (शं.ना.जोशी व ग.ह.खरे पृ.२८२–रु.३ व रु.२०८)
(२५) राजधानी रायगड (पृ. १६४–श्री. वि. वा. जोशी रु. १ व ०१२)
(२६) Shivaji (pp. 410–C.V. Vaidya Rs. 3 and Rs. 2–8–0)
(२७) आळंदी (पृ. २०–श्री. ग. ह. खरे ०२)
(२८) मठगांवचा शिलालेख : कुडाळप्रांतेतिहास (पृ.१६५ वालावलकर रु.१०२ व ०१२)
(२९) पुरंदरे दप्तर भाग ३ रा (पृ. २५०–श्री. कृ. वा. पुरंदरे ३ रु. व रु. २०८)
(३०) मध्वमुनीश्वराची कविता (पृ. २५८–श्री. कै. प्र. व्यं. गुब्बी ३ व २०८)
(३१) मराठ्यांच्या उत्तरेकडील मोहिमा (पृ. ९०–श्री. वि. गो. दिघे रु. १ व ०१२)
(३२) वेदस्तुति आणि स्फुट कविता (कृष्णदयार्णवकृत)–(किं.०१२ व ०१०)
(३३) ज्ञानप्रदीप (पृ. १२५–प्रो. द. वा. पोतदार रु. १ व ०१२).
(३४) पेशवाईच्या सावलींत (पृ. ४००–श्री. ना. गो. चापेकर किं. रु.४ व ३.)
(३५) मूर्तिविज्ञान (श्री. ग. ह. खरे–पृ. २५०,९४ चित्रें; मूल्य रु. ३०८ व ३).
(३६) आठल्ये घराण्याचा इतिहास–वि. वा. आठल्ये पृ. ४४० ३॥–३.
(३७) किल्ले पुरंदर–कृ. वा. पुरंदरे पृ. १६२ किं. १–०१४
(३८) किल्ले विशाळगड (पं. वा. शिरवळकर पृ. ९३–रु. १ व ०१२)
(३९) श्रीशिवकाव्य (प्रकाशक–ह. वा. भावे, पृ. २६६–रु. २॥ व २)

श्रीमंत बाबासाहेब घोरपडे, इचलकरंजीकर



जन्म इ. १८७० मृत्यु इ. १९४३ आक्टो. २१

इतिहासाचार्य दत्तात्रेय विष्णु आपटे



जन्म श. १८०२ फा. शु. १३
इ. १८८१ मार्च १३

मृत्यु श. १८६५ आश्विन व. १४
इ. १९४३ आक्टो. २७

# किंचित् प्रास्ताविक

आपल्या ह्या त्रैमासिकाच्या अंकाचे बाबतींतील प्रस्तुतच्या धोरणास अनुसरून- अंक पूर्ण रूपांत छोटेसें पुस्तक म्हणूनच काढावयाचा व सामान्यतः शिलकी निबंध- टांचणांतील साहित्यासह नवे लेख त्यांत घ्यावयाचे-हा अंक ऐ. संकीर्ण निबंध खंड म्हणून काढला आहे.

मंडळाच्या पंधरवड्याच्या सभांतून सामान्यतः नवसंशोधित ऐ. कागदपत्रेंच चिकित्सापूर्वक अधिक वाचलीं जातात, संकलनात्मक निबंध त्यामानानें कमी. वार्षिक सभांतून म्ह. संमेलन, वा वाढदिवस समारंभांत मात्र निबंधवाचनच अधिक होतें. तात्पर्य, ऐ. निबंधाचें प्रमाण ऐ. कागदपत्रांचे मानानें थोडें आहे. व विचाराच्या वाटेनें पाहतां मं. चें हेंच प्रमुख काम होय. म्हणून मं. च्या ग्रंथप्रसिद्धीकरणांतहि ह्याच प्रमाणानुसार ग्रंथ छपाई होते. व अशापैकींच हा निबंध-खंड आहे.

ह्या खंडांत श. १८३९ ते शक १८६५ मधील कांहीं निबंध घेतले आहेत. हे निबंध २१ असून ते १ घराणीं-व्यक्ति, २ शिल्पचित्रकला, ३ ग्रंथविषयक, ४ गणितज्योतिष, ५ तात्त्विक वृत्तांतपर अशा पांच विभागांतील म्हणून आले आहेत. इंग्रजी दोन निबंध शेवटीं जोडले आहेत तरी विषयदृष्ट्या ते ग्रंथविषयक ह्या तिसऱ्या विभागांतीलच होत. ह्या २१ निबंधांतहि केवळ नवीन घराणीं व्यक्ती ८, संकलनात्मक ९, सूचनात्मक २, उपोद्धलक १ व चर्चात्मक, १ असे ४, ५ स्वरूपभेद दाखवितां येतील व कालदृष्ट्या शिवकालीन ४, शिवोत्तर कालीन ६, शिवपूर्वकालीन ७ व इतर ४ असे हे निबंध म्हणतां येतील.

ह्या खंडांत आलेल्या निबंधांविषयीं येथें ह्याहून वेगळें कांहीं लिहिण्याचें कारण नाहीं. निबंधाला आवश्यक तेथें टीपा व सूचना दिलेल्या आहेत. आपापल्या परीनें सर्वच निबंध माहितीपूर्ण व उद्बोधक आहेत. त्यांतहि निबंध १४ मधील याज्ञवल्क्यांचा 'योगशास्त्रं च मत्प्रोक्तं' म्हणून सांगितलेला त्यांचा ग्रंथ म्हणजेच याज्ञवल्क्यगीतोपनिषद् हा ग्रंथ व त्यांची तिसरी सहधर्मिणी पत्नी गार्गी ह्या गोष्टींकडे नावीन्यदृष्टीनें वाचकांचें अधिक लक्ष्य जाणें इष्ट आहे.

तसेंच 'देशमुखी वतन' ह्याहि निबंधाकडे अंगुलिनिर्देश करणें त्याहूनहि इष्ट वाटतें. सामान्यतः हाच विषय शि. च. सा. खं. ७ च्या प्रस्तावनेंत श्री. पुरंदरे ह्यांनीं चर्चिला आहे. त्यांतील कांहीं विचार ह्या निबंधांतील विचारांशीं जुळतात, तर कांहीं मतभेदाचे आढळतील. तेथें म्हटलें आहे 'शिवाजीनें गांववतनदारांच्या वतनदारांत

सरकारच्या सत्तेचा अनेक प्रकारचा पाचर मारण्याची तजवीज केली, ती राज्यक्रांतीच्या वेळेस वतनदार वतनाच्या भिडेनें प्रतिपक्षास साह्य करूं लागले म्हणून.' पृ. ४, पुढें पुनः पृ. ७ वर त्यांनीं लिहिलें आहे कीं, 'त्या काळीं सत्ताधीशांच्या व ती आक्रमण करूं पाहणाऱ्या उदयोन्मुख चळवळ्यांचा देशमुखासंबंधी जो रागद्वेष दिसून येतो तो त्यांच्या वतनी कर्तव्यामुळें नसून, ते एकेच ठायीं पिढ्यानपिढ्या वाढल्यामुळें त्यांनीं आपला जो वैयक्तिक दर्जा वाढवून घेतला त्यामुळें होय.' ह्याचाच स्पष्ट अर्थ ह्या खडांतील निबंधांत पृ. ६९ वर असा आला आहे कीं, 'शिवाजी किंवा राजनीतिकार हे देशमुखीच्या विरुद्ध नाहींत; देशमुखांच्या विरुद्ध आहेत.' असो. ह्या निबंधांतील सर्वच विवेचन साधार केलेलें असल्यामुळें तो विशेष उल्लेखनीय वाटतो. विशेषतः ह्याप्रकारचे लेख, ऐ. राज्यकारभार-पद्धती कशी, राजकचेऱ्यांतील व लोककचेऱ्यांतील कामें कशीं होत हें सांगणारे असल्यामुळें अधिक अपेक्षित आहेत.

प्रा. गोडे ह्यांचा निबंधहि अतिशय महत्वाचा व नवीन भर घालणारा झाला आहे.

१७।११।४३ } चिटणीस
भा. इ. सं. मंडळ



ऐ. संकीर्ण निबंध खंड १

# अनुक्रमणिका

# ऐ. सं. निबंध खं. १

## विषय सूची

# संकीर्ण निबंध खंड

## खंड १

### १ घराणीं व व्यक्ति

## १ कन्नडकर ज्योतिषी घराण्याचा कांहीं पूर्ववृत्तान्त

(श्री. विष्णु बालकृष्ण जोशी, कन्नडकर)

ह्या घराण्यास *यादव वंशांतील 'रामदेवराव' जाधव यांच्या वेळची ज्योतिषगुणाबद्दल राजसभेंत सन्मान होऊन ताम्रपटावर सनद करून दान दिलेली भूमी पहिल्याइतकी राहिली नाहीं तरी थोडीशीच, एक नंबराइतकी, इनाम जमीन अजून वहिवाटीस आहे. मूळ सनद नसल्यानें सांप्रतच्या सरकारनें त्या जमिनी-वर कर बसविला आहे. शक १२१५ च्या सुमारास या लेखकाच्या त्र्यंबक नांवाच्या पूर्वजाला ही मिळालेली सनद पाहिल्याचें कांहीं गृहस्थांकडून अजूनही सांगण्यांत येतें. पण तो ताम्रपट कांहीं आपत्तीमुळें विनाश स्थितीलाच पोंचला असावा असें वाटतें.

ज्या त्र्यंबक नामक पूर्वजांचें देवगिरी राजधानीस जाणें येणें असे त्यानें स्वतः तत्कालीन श्रीज्ञानेश्वर महाराज यांस पाहिल्याचें पूर्वापार सांगत आले आहेत. 'मुहूर्त-मार्तंडकार' नारायण दैवज्ञ यांच्या पूर्वजांना व या कन्नडकर ज्योतिषांना 'देवगिरी सरकार' कडून कांहीं वर्षासनेंहि होतीं, पण तीं पुढें शक सुमार १२३२ चे पासून बंद पडलीं असेहि शोध आहेत.

'मुहूर्तमार्तंड' या मुहूर्तविषयक उत्कृष्ट ज्योतिष ग्रंथाचे कर्ते श्रीनारायण-दैवज्ञ हे शुक्ल यजुःशाखीय कौशिक गोत्री ब्राह्मण. यांनीं आपली परंपरा स्वकृत ग्रंथाच्या शेवटीं अशी दिली आहेः—

* पा. स. ३।४५

आसीत् सासमणूरनामनगरे श्रीकौशिकस्यान्वयेऽनंतोवाजसनेयि पूज्यचरणो माध्यंदिनीयाग्रणीः । कृष्णस्तत्तनयः श्रुतिस्मृतिविदामग्रेसरेज्योहरिस्तत्पुत्रः श्रुतिवित्तदात्मजवरोऽनंतोग्निहोत्री गुरुः १ अनंत–कृष्ण–हरि–अनंत—




नारायण दैवज्ञाचे पिते अनंत हे चातुर्मास्ययाजी असून ज्योतिष विद्येंत पारंगत होते. नारायण हे प्रथम अनभ्यस्त होते पण पश्चात्तापानें गांवच्या जवळच महेश्वरमाळ ऊर्फ म्हैसमाळ मधील गिरिजा देवीच्या जागृत स्थानावर जाऊन त्यांनीं अनुष्ठान केलें व सिद्धि मिळविली. प्रतिदिनीं सूर्याची उपासना, अर्घ्यप्रदान करून व सूर्यनमस्कार ते घालीत. टापरगांवाच्या जवळच शिवनदी वाहत आहे तेथें त्यांच्या उपासनेची व सूर्यनमस्काराची जागा नियमित असे. एकाच ठिकाणीं नमस्कार घालीत गेल्यानें त्या खडकावर दोन्ही हातांचें, पायांचें, गुडघ्यांचें खोलगट चिन्ह उमटलेलें अजून दिसून येत आहे. तेथें जवळच सूर्यकुंडहि आहे.

कन्नड तालुक्यांत हें टापरगांव असून तें कन्नडेच्या दक्षिणेस आठ मैलांवर आहे. वेरूळक्षेत्र तेथून १० मैल रहातें. त्यांनीं स्वतःविषयीं सांगितलें आहे––

'ख्यातं देवगिरेः शिवालयमुदक् तस्मादुदक् टापर-
ग्रामस्तद्वसतिर्मुहूर्तभवनं मार्तंडमत्राकरोत् ।'

"प्रसिद्ध असलेल्या देवगिरीच्या उत्तरेस शिवालय ( वेरूळ = घृष्णेश्वर ) आहे. त्याच्या उत्तरेस टापरगांव, तेथें रहात असतां ह्या मुहूर्तमार्तंड ग्रंथाची रचना झाली" इ. सासमणूर नामकगांवीं पूर्वज रहात होते म्हणून वर्णन आहे; परंतु सासमणूर गांवाचा शोध लागत नाहीं.

टापरगांव हें ह्या घराण्याच्या ज्योतिषवृत्तीचें गांव. तेथें राहून नारायणशास्त्र्यांनीं शिष्यांना पढवावें. ज्योतिषविद्येचें व वेदविद्येचें त्यांनीं एक गुरुकुलच काढिलें होतें म्हटलें तरी चालेल. याशिवाय त्यांनीं इतरही कांहीं ज्योतिष ग्रंथ केल्याची प्रसिद्धी आहे. †यांना किंवा यांच्या बंधूंना संततीचा अभाव झाल्यामुळें त्यांच्या घरांतील

†'चरित्रकोश' पृ. ४८९–९० वर आलेलें नारायणभट्ट–चरित्र हें प्रयोगरत्नाकर म्ह. नारायणभट्टी इ. इ. प्रसिद्ध ग्रंथांचा कर्ता व विख्यात मीमांसक ह्याचें आहे. त्यांतच नामसादृश्यामुळें ह्या नारायणभट्ट दैवज्ञाचे चरित्राचा निर्देश दृष्टिदोषामुळें झाला आहे. ह्या नारायणभट्ट दैवज्ञाचें चरित्र कै. पं. शं. बा. दीक्षितकृत भा. ज्यो. ह्या विद्वन्मान्य ग्रंथांत पृ. २७७ वर, चरित्रकोश पृ. ३०६ 'गंगाधर ३' येथें व इतरहि

अमूल्य ग्रंथसंग्रह कालाच्या भक्ष्यस्थानीं पडला. टापरगांव येथें त्यांची अद्याप जागा मोकळी पडलेली असून त्यांची एक समाधि आहे व एक आच्छादित कूप त्यांच्या वेळचा आहे.

पैठणकर भगवद्भक्त एकनाथ महाराज व नारायण दैवज्ञ समकालीन होत; याला प्रमाण असें—

वाराणसी महापुरी । मणिकर्णिकेच्या तीरीं ।
रामजयंती माझारीं । ग्रंथ निर्धारीं संपविला ८३
तैं शके चौदाशें त्र्याण्णव । प्रजापतिसंवत्सराचें नांव ।
चैत्रमास महापर्व । अभिनव रामनवमी ८५

रुक्मिणीस्वयंवर–प्रसंग १८

'त्र्यंकेंद्र (१४९३) प्रमिते वर्षे शालिवाहन जन्मतः ।
कृतस्तपसि मार्तंडोऽयमलं जयतूद्गतः १ मु. मा. अलंकार प्रकरण.––

एकनाथ व नारायण दैवज्ञ यांनीं एकाच शकांत आपापले ग्रंथ तयार केल्याचें वरील प्रमाणावरून सिद्ध होत आहे.

या नारायण दैवज्ञाचे बंधू कृष्ण यांना; प्रस्तुत लेखकाच्या धुंडिराज नामक पूर्वजाची, आनाबाई नामक बहीण दिली होती. असें त्या वेळच्या पत्रव्यवहारावरून समजतें. शिवाय, नारायण दैवज्ञ सस्त्रीक व त्यांचे बंधू कृष्ण हे दिवंगत झाल्यावर कृष्ण यांची स्त्री आनाबाई हिचेकडून त्या वेळच्या ग्रामस्थ मंडळींनीं बाईचे बंधु धोंडराज यांना टापरगांव येथील ज्योतिष वृत्तीबद्दल जो कागद करून दिला तो अद्याप संग्रहांत कायम आहे.

---

कांहीं ग्रंथांत आलें आहे. तेथें म्हटलें आहे कीं, नारायणभट्ट दैवज्ञास गंगाधर हा मुलगा होता; त्यानें ग्रहलाघव ग्रंथावर मनोरमा नांवाची टीका लिहिली आहे आणि त्याचा मातुल वंश विद्यमान आहे. पण वर जी माहिती आली आहे तींत आलेला वंश हा गंगाधराचा मातुलवंश आहे काय ? वरील माहिती लक्षांत घेतां हा वंश गंगाधराच्या चुलतीच्या भावाचा आहे. गंगाधराच्या आईच्या भावाचा म्ह. नारायण-भट्टाच्या मेव्हण्याचा नाहीं. शिवाय गंगाधराचाच वरील माहितींत निर्देश नाहीं. आफ्रेट सूचींत ग्रहलाघववरील टीका मनोरमा दिली आहे. पण त्या टीकेचा कर्ता गंगाधर नसून कमलाकर सांगितला आहे. आणि ' गोत्रे श्रीमति कौशिके समभवद्यः श्रीहरि स्तत्सुतोऽनंतस्तत्तनयः श्रुतिस्मृतिविदां नारायणोग्रेसरस्तत्सूनुर्ग्रहलाघवस्य विवृतिं गंगाधरः प्रस्फुटां । ग्रामे टापरनाम्न्यचिकरदिमां श्रीपर्वतीराश्रमे ॥ ह्या श्लोकांत ' ग्रहलाघवविवृति ' किंवा ' अलंकार–व्याख्या ' असें नांव गंगाधरकृत टीकेचें आलें आहे.—शं. ना. जोशी.

विठ्ठलपंत–शंकरभट्ट— १ धुंडिराज
— २ बापू–धुंडिराज– [ बहीण आनाबाई. ही टापरगांव येथें दिली होती. ] – रंगनाथ–राजाराम–पांडुरंग–हरि–त्र्यंबक




विठ्ठलपंत यांचे पूर्वज कोणी त्र्यंबक होते; त्यांस देवगिरीच्या राजसभेकडून देणगी मिळाली होती. हें प्रारंभीं आलेंच आहे. सदर वंशावळींतील शंकरभट्ट यांचे पुत्र धेंडिराज व कन्या आनाबाई ही नारायण दैवज्ञाचे बंधूस दिली होती; व बापूचे पुत्र धुंडिराज व कन्या आनाबाई असा मतभेद आहे. ही आनाबाई संतानरहित निवर्तल्यानंतर टापरगांवची ज्योतिषवृत्तीही वडिलांनीं सोडून दिली. विठ्ठलपंत यांचे वेळेपासून सदर जोशी घराण्यांत मुख्य दोन विभाग झाले. संततीकरितां दत्तक घेतल्यानंतर संतती झाली म्हणून दोन समान भाग होऊन दत्तकास 'दत्त' ही संज्ञा परंपरेनें चालली. व मूळचें जें घर त्यास मुळे हें नांव प्राप्त झालें. यामुळें कालांतरानें दोन घरें झालीं. दत्ताचीं दोन व मुळ्यांचीं दोन अशीं हल्लीं मुख्य चार घरें विद्यमान आहेत. मध्यंतरीं शक सुमारें १७०१ पासून दत्त व मुळे यांमध्यें आपसांतील वृत्तीसंबंधानें वाद चालू झाला. वादाचें स्वरूप थोडक्यांत असें—कन्नड, डांगरें, मोरडें, भिकारखेडें, बाह्मणी, हिवरखेड, गोताळें, अंधारवाडी, मालपूर, रिठी, हीं दहा गांवें निमेनिम वांट्याचीं व बहिरगांव, दाभाडी, डोनगांव या तीन गांवांत मुळे यांचे दोन हिस्से व दत्त यांचा एक हिस्सा अशी वहिवाट होती. परंतु दत्त यांनीं कलह उपस्थित करून सरकारदरबार केलें. हा वाद सुमारें ३०।३२ वर्षें चालू होता. मधून मधून पुष्कळ समेट व आज्ञा–पत्रें झालीं. तीं अस्सल पत्रें दप्तरांत अजून आहेत. त्यांपैकीं कांहींचा सारांश असा––

नक्कल––

–०- -–०-

पांडुरंग चरणीं दृढ भाव पलाजी सुत सटवाजी जाधवराव
( अष्टकोणी शिक्का )

छ. मो अनाम देशमुख व देशपांडे मौजे दाभाडी प्रा कन्हड यासी लक्षुमणराव जाधवराव सुा तीसा मया तैन व आलफ वो राजश्री राजारामभट्ट जोसी [ मुळे ] कन्नडकर याचे जोशीपणाचे मौजे मारचे हिसे व विनायकभट्ट ( दत्त ) याचा एक हिसा पूर्वापार चालत आला असोन आता वाद

घालितात. राजारामभट्ट यांनीं पुणे मुकामी विदित केले ... ... ... तरी नवीन करू नये. त्यास हे ताकीदपत्र सादर केले असे. ... ... नूतन न करणे जाणिजे छ २३ रज्जब.*
मोर्तब
सुद

कित्येक हुकमांत व पत्रांत 'सरकार दौलताबाद' असेंही लिहिलेलें आहे. अजूनपर्यंत यादवांची बरीच मोठी जहागीर 'राजाचें देऊळगांव' या संस्थानला चालूं आहे.

शेवटीं, वरील वादाचा निर्णय आपसांतच लागला. त्यावेळची एक फारकती सांपडली आहे--

[ नकल ] §फारखती सके १७३५ युवानाम माह श्रावण वद्य ८।९ ते दिवसी लिखिते विनायकभट ( दत्त ) मै बिरादर को। कंन्हड वगैरे सरकार राज दौलताबाद सुभे खुजस्त बुनीयाद सुा सन १२२५ [ हिज्री ] कारणे ... ... ... सदरहू गावात १३ मुख्य भाग २ विभाग ४ या पुढे निमे निम वाटणी खुष रजावंदीने घेत देत जाणे कळावे. [ खालीं साक्ष ] कुळस्वामीची व ब्राह्मणाची शपथ घातलेली आहे.

तालुके कन्नडपासून थोडें वायव्य कोणाला सुमारें १२ मैल पायरस्त्यानें व २४ मैल गाडीरस्त्यानें पाटण येथें श्रीमाहूरच्या देवीचें स्थान जागृत आहे; चाळीसगांवापासून दक्षिणेस ८।१० मैल आहे. तेथेंच पूर्वी सुप्रसिद्ध भास्कराचार्य ज्योतिषी रहात होते. ग्रहगतिज्ञानार्थ पूर्वी शक १००० चे सुमारास तेथें स्फटिकमय जलयंत्रें केलेलीं होतीं.

'आसीत् सह्यकुलाचलाश्रितपुरे त्रैविद्यविद्वज्जने ।
सानासज्जनधाम्नि विज्जडविडे शांडिल्य-गोत्रो द्विजः'

सह्याद्रीच्या पश्चिमभागावर पुर= पाटण हेंच होय. हें पूर्वी फार मोठें शहर होतें. हें ठिकाण डोंगरावर आहे. तेथें देवीचें देवालय प्राचीन आहे त्यांत मुख्य स्थान अतिप्राचीन आहे पण देवालयाचा कांहीं भाग नंतर बांधला गेला असावा. कारण भास्कराचार्यांच्या [ शक १०३६-१११५ ] कालानंतर त्यांचा नातू चंगदेव हा देवगिरीच्या

---

* ह्या पत्रांतील कालोल्लेखाचे शब्द फारच संशयित आहेत. इतर भाषा इत्यादि आहे तसेंच विश्वास्य मानणें कठीण आहे.

§ ह्याहि लेखांतील शकांक व संवत्सरनाम, सुहूर सन इ. सर्व विसंगत आहे. पत्र मूळ पाहिल्याशिवाय प्रमाण मानणें अशक्य.

सिंघण राजाचा ज्योतिषी होता. भास्कराचार्य व त्यांचे वंशज यांनीं केलेल्या ग्रंथांचें अध्ययन सर्वत्र व्हावें म्हणून पाटण येथें चंगदेवानें–

'श्रीभास्कराचार्यनिबद्धशास्त्रप्रस्तारहेतोः कुरुते मठं यः ।'

अशाविषयींचा शिलालेख खोदलेला सध्यां देवीच्या देवळाला लागलेला आहे. चंगदेवानें स्थापन केलेल्या मठांतून तत्कालीन बरेच विद्यार्थी विद्याध्ययन करून कृतकृत्य झाले असावेत. माझे पूर्वजांना जगदंबेनें प्रसन्न होऊन एक सप्तशतीची पोथी प्रसाद दिलेली अजूनपर्यंत देवगृहांत सुरक्षित आहे. सदरील पोथीचीं पानें बरींच जीर्ण असून त्यावर लेखनशक किंवा लेखकाचें नांव नाहीं. आरंभीं कांहीं चित्रें देवीचीं एकेरी लाल रंगांत काढिलेलीं प्राचीन पद्धतीप्रमाणें आहेत. व ही वरील माहिती परंपरेनें सांगण्यांत आली आहे.

ज्योतिषवृत्तींचें गांव कन्नडपासून पूर्वेस दोन मैलावर बहिरगांव म्हणून आहे. तेथें शक १६०० शेंच्या शेवटीं एक सत्पुरुष व कवि होऊन गेले. हे हिरापुरीमहाराज या नांवानें प्रसिद्ध आहेत. हे मूळचे उत्तर हिंदुस्थानांतून इकडे आलेले. सुप्रसिद्ध दौलताबादचे मानपुरी बुवा व हे समकालीन. मानपुरी बुवांचीं पदें सुप्रसिद्ध आहेत. यांचीं कांहीं पदें व अभंग आमचे संग्रहाला आहेत. यांचे शिष्य गोसावी श्री वेरूळ येथील मठांत रहात. तेथें त्यांनीं गुरुआज्ञेनें 'शिवालय महात्म्य' नामक एक ओंवीबद्ध ग्रंथ ३६ अध्यायांचा केलेला सध्यां उपलब्ध झाला आहे. श्रीहिरापुरी महाराज यांची समाधी शिवनदीचे तीरीं बहिरगांव येथें मठांत आहे. त्या समाधीच्या पुढच्या आंगास मध्यभागीं पुढील श्लोक खोदलेला आहे—

"बहिरग्रामपुरी शिवात्मजतिरीं साक्षात मुक्तीपुरी । तेथें संत हिरापुरी प्रगट जो कूटस्त बाह्यंतरीं । सके शोडषते अठयात्तर तथा धाताच संवत्सरी । आषाढे नवमी समाधि दिवसां मध्याह्न शुक्की बरी" [१६७८ आषाढ शुद्ध ९ = इ. १७५६ जुलै ६]

---

# २ मीर जुमला

( प्रा. **वि. वि. देशपांडे**, हिंदु विश्वविद्यालय, बनारस )

*कुतुबशाहीच्या रियासतीमध्यें व पर्यायानें दक्षिण हिंदुस्थानच्या सतराव्या शतकांतील इतिहासामध्यें मीर जुमला याचें नांव वारंवार प्रामुख्यानें येतें. त्याचा उदय व अस्त एकाद्या धूमकेतूच्या उदयास्ताप्रमाणें अकल्पित झाला असला तरी धूमकेतू-

* संमेलन २३ वें श. १८५८

प्रमाणेंच त्याच्या जीवनाच्या परिणामाची छाप मात्र त्या काळच्या इतिहासावर पडल्या-खेरीज राहिली नाहीं. अदिलशाही किंवा कुतुबशाही मसनदीचे तत्कालीन इतिहास-कार तर मीरजुमल्याला विसरूं शकले नाहींतच; परंतु औरंगजेबासारख्याच्या खासगत पत्रांमधून देखील या पराक्रमी पुरुषाच्या कर्तबगारीचे अनेक उल्लेख ठिकठिकाणीं सांपडतात. औरंगजेबाचे सुप्रसिद्ध इतिहासकार सर जदूनाथ सरकार यांच्या सदरील चरित्राच्या पहिल्या खंडांत ह्या जुमल्याच्या हकीकतीबद्दल सुमारें १०० पृष्ठांचीं दोन प्रकरणें खर्च पडलीं असून त्याच विषयावरील अगदीं अलीकडील लेखक झहिरुद्दिन फरूकी यांनीही बऱ्याच सविस्तर रीतीनें मीर जुमल्याच्या चरित्राचा समाचार घेतला आहे. प्रस्तुत चरित्रविषयाची सविस्तर माहिती मराठीमध्यें फारसी उपलब्ध नाहीं. व त्याच्या या वर उल्लेख केलेल्या दोघा प्रमुख चरित्रकारांनीं त्याच्या चरित्रांतील एक प्रमुख प्रसंग गाळला आहे; तसेंच सर जदुनाथ आणि फरूकी यांच्यामध्यें कित्येक ठिकाणीं विरोध उत्पन्न झाला आहे. तेव्हां मराठीमध्यें थोडक्यांत त्याचें शक १५७० ते १५८० मधील चरित्र द्यावें व जदुनाथ आणि फरूकी यांच्यामधील विरोधाची छाननी करावी या हेतूनें हा निबंध लिहिला आहे.

मीर जुमला ह्याचें खरें नांव मीर महंमद सय्यद असें असून तो एक इराणी सरदार होता. त्याच्या कर्तृत्वास एक जवाहिराचा व्यापारी म्हणून सुरुवात झाली. व निरनिराळे देश फिरत फिरत शेवटीं तो शक १५५२ च्या सुमारास दख्खनमध्यें स्थिर झाला.

जवाहिऱ्याच्या विद्येवर त्यानें अलोट पैसा कमविला. परंतु त्याची जबर महत्त्वाकांक्षा व त्याचें असामान्य कर्तृत्व त्याला तेथेंच स्वस्थ बसूं देईना. व आपल्या डामडौलानें, मोहक वक्तृत्वानें आणि युक्तिकौशल्यानें त्यानें अबदुल्ला कुतबशहा याज-वर चांगलीच छाप बसवून तो थोडक्याच दिवसांत त्याचा मुख्य वजीर झाला.

कुतुबशाहीच्या कारभारांत एकदां याचा जम बसल्यावर तो आपल्या मालकास तुच्छ लेखूं लागला. आपल्या संपत्तीच्या जोरावर त्यानें आपल्या पदरीं हजारों घोडदळ व पायदळ सैन्य ठेविलें व सदर सैन्याच्या मदतीनें त्यानें सारें पूर्व कर्नाटक म्हणजे बंगळूरपासून कारोमांडेल किनाऱ्यापर्यंतचा प्रदेश कुतुबशाहीस जोडला म्हणण्यापेक्षां आत्मसात् केला हें म्हणणें अधिक शोभेल. अशा रीतीनें तो जरी नांवाला कुतुबशाहीचा वजीर म्हणून मिरवत असे तरी प्रत्यक्षपणें तो बऱ्याच मोठ्या प्रदेशावर स्वतंत्रच स्वामीत्व गाजवीत असे.

जुमला हा अशा रीतीनें जरी महापराक्रमी सेनापती असला व जवळ जवळ सर्व कर्नाटकांतील हिंदू पाळेगारांना जरी त्यानें जेरीस आणिले असले तरी देखील त्याला हतप्रभ करून वठणीवर आणणारा एक पराक्रमी हिंदू सेनापती निघालाच व तो म्हणजे शहाजी हा होय. शक १५७१ मध्यें कैदेंतून सुटका झाल्यानंतर शहाजी बंगळूरास निघून गेला व तेथें तो सगळीकडे स्थीरस्थावर करून प्रायशः स्वतंत्रपणेंच

वावरू लागला. इकडे मीरजुमला हा कर्नाटकामध्यें आपल्या मसनदीची सत्ता वाढवीत-च होता. व होता होता हिंदू पाळेगारांच्या राज्याच्या सीमा ओलांडून तो विजापूर-करांच्या हद्दींत शिरला. अशा रीतीनें या दोन शाह्यांमध्यें भांडण उपस्थित झालें. जुमल्यावर स्वारी करून त्यास हाकून देण्यास अदिलशहानें शहाजीचीच योजना केली. व शहाजीच्या जहागिरीची सरहद्दही कुतुबशाहीस भिडली असल्यामुळें त्याला ही काम-गिरी इष्टच होती. जुमल्याच्या मदतीस राजा रायल, बिदनूरचा शिवाप्पा नाईक इत्यादि किरकोळ पाळेगार बरेच होते. शक १५७३ च्या मार्गशीर्ष पौष महिन्यांत शहाजीनें मीरजुमल्याचा चांगलाच समाचार घेतला व त्यास गुत्तीच्या किल्ल्यांत कोंडून तह करा-वयास भाग पाडिलें. सदरील शहाजीची जुमल्यावरील स्वारी जदुनाथ किंवा फरूकी हे दोघेही देत नाहींत. परंतु राधामाधवविलास—चंपूकार जयरामानें या स्वारीचें एका-दशउल्लासामध्यें ११ व्या भागांत अगदीं स्वतंत्रपणें बरेंच सविस्तर वर्णन केलेलें आहे. व या विजयानें शहाजीची कीर्ति चहूंकडे पसरली असेंही त्यानें मोठ्या रसभरीत भाषेंत कथन केलें आहे. सदरहू स्वारीच्या हकीकतीस केवळ एका समकालीन काव्याच्या आधाराशिवाय दुसरा कोठें महत्वाचा आधार मिळतो किंवा कसें हें पाहात असतां इंडियन् फॅक्टरी रेकार्ड्स् भाग ९ पृष्ठ ९९ वर मद्रासेहून विलायतेस ता. १४ जानेवारी १६५२ मध्यें पाठविलेलें एक बातमी पत्र छापलेलें आहे, त्यामध्यें विजापूर व गोवळकोंडे यांच्या दरम्यान युद्ध सुरू आहे. व बरेच दिवस हें युद्ध सुरू असून विजा-पूरच्या सैन्यानें नबाब मीरजुमल्यास गोवळकोंड्याच्या राज्यांतील डोंगरींत कोंडून टाकलें आहे असा स्पष्ट उल्लेख सांपडला. त्यावरून जयराम कवीनें रसभरीत वर्णन केलेल्या काव्यांत जरी कांहीं अतिशयोक्ती असली तरी स्वारी प्रत्यक्ष झाली यांत संशय नाहीं. सर जदुनाथ काय किंवा फरूकी काय आपल्या ग्रंथामध्यें आपण मराठी साध-नांचा ग्रंथ लिहिण्याच्या कामी भरपूर उपयोग करतो असें म्हणतात मात्र; परंतु त्यांच्या हातून हें काम यथास्थितपणें पार पडत नाहीं असें म्हणणें प्राप्त होतें.

सदरीलप्रमाणें शहाजीनें मीरजुमल्याच्या आपल्या राज्याच्या मर्यादा वाढविण्या-च्या उद्योगाला जरी पायबंद घातला तरी देखील त्यानें अगोदरच जिंकलेला मुलूख येवढा मोठा होता व त्या मुलूखापासून त्याला दरसाल प्राप्त होणारें उत्पन्न एवढें जबर-दस्त होतें कीं त्याच्या योगानें तो आपल्या कालामधील दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व मातबर पुरुषांत श्रेष्ठ ठरला. सुमारें तीनशें मैल लांब व ५० मैल रुंद येवढा मोठा कर्नाटकचा भाग त्याच्या जहागिरींत मोडत असे. व जहागिरीपासून त्याला दरसाल ४० लक्ष रुपयांचें उत्पन्न प्राप्त होत असे. तसेंच या प्रदेशामध्यें हिऱ्याच्या व जवाहिरा-च्या पुष्कळ खाणी असल्यामुळें थोडक्याच दिवसांत त्याच्या जवळ २० मण वजनाचे नुसते हिऱ्याचे खडे जमले. अशा या बलाढ्य सरदारास आपल्या पक्षास ओढून घ्यावा अशी आदिलशाही मुत्सद्यांस व मोगलांचा त्यावेळचा दख्खनचा सुभेदार औरंगजेब

यांस साहाजीक्य इच्छा झाली. व त्यांनीं त्या दिशेनें आटोकाट प्रयत्नही केले. इकडे जुमल्याचें वाढत असलेलें सामर्थ्य पाहून त्याचा स्वामी जो अबदुल्ला कुतुबशहा याच्या मात्र उरांत धडकी भरली. व तो त्याच्या नाशाच्या उद्योगास लागला. शहानें त्याचे डोळे काढण्याचा कट केला परंतु मीरास त्याची बातमी अगोदरच समजल्यामुळें तो गोवळकोंड्याहून कर्नाटकांत निघून गेला.

आपल्या जिवावर बेतली हें पाहतांच मीर हा दुसरीकडे संधानें बांधण्याच्या उद्योगास लागला. औरंगजेब असली संधी हेरीतच होता. त्यानें आपला कुतुबशहाजवळील वकील, मीरकडे पाठवून बादशहाच्या तर्फे रक्षणाचें त्याला आश्वासन दिलें व मीरच्या मुलास पातशाही रुपेची खूण म्हणून पोषाक पाठवून दिला. मीरजुमल्यानें बादशाकडे जाण्याची आपली तयारी दर्शविली. परंतु त्यानें ही बातमी गुप्त राहावी अशी औरंगजेबास विनंति केली. सदरहूप्रमाणें औरंगजेबानें शहाजहानास कळविलें. परंतु बादशहानें ही बातमी गुप्त न ठेवतां कुतुबशाहास मीरजुमला आमचे दरबारीं येण्याची इच्छा करतो आहे त्यास आपण मनाई करूं नये अशा अर्थाचें पत्र लिहिलें. या पत्रामुळें किंवा इतर कारणांमुळें जुमल्याची कुतुबशाहींतून निसटण्याची बातमी फुटलीच व अबदुल्ला कुतुबशानें मीरचा मुलगा महंमद अमीन यास व त्याच्या आईस व बहिणीस कैदेंत टाकलें. महंमद अमीन व मीरचे कुटुंबांतील इतर मंडळी यांच्या कदेसंबंधीं सर जदुनाथ यांचें मत असें आहे कीं, महंमद अमीननें दारू पिऊन मसनदीचा अपमान केला म्हणून त्यास कुतुबनें कैदेंत टाकलें व त्यावेळीं मीर फुटल्याची बातमी प्रसृत झाली नव्हती. परंतु फरूकी यांनीं जो पक्ष घेतला आहे तोच या ठिकाणीं योग्य वाटतो. कारण महंमद अमीन यानें वैयक्तिक दारू पिऊन जरी मसनदीचा अपराध केला असला असें गृहीत धरलें तरी महंमदची आई व बहिणी यांना त्याजबरोबर कैदेंत टाकण्याचें कांहींच कारण नव्हतें. तेव्हां जुमल्यानें आपलीं बायकामुलें व आपली मिळकत घेऊन या राज्यांतून निघून जाऊं नये म्हणूनच गोवळकोंड्यास जेवढी जुमल्याच्या कुटुंबांतील मंडळी हजर होती तेवढ्यांना कुतुबनें कैदेंत टाकलें व त्यांची मिळकत जप्त केली. ही गोष्ट शक १५७७ च्या कार्तिकांत घडली. मासिर उल–उमरामध्यें फरूकी यांनीं प्रतिपादन केल्याप्रमाणेंच कैदेचें कारण सांगितलें आहे.

मीर जुमल्याच्या कुटुंबाची कैद ही औरंगजेबासारख्या धूर्त व कावेबाज मुत्सद्याच्या चांगलीच पथ्यावर पडली. त्यानें लागलीच दिल्लीस बादशहास पत्र लिहून कुतुबशहानें केलेल्या बादशहाच्या अपमानाची बातमी कानावर घातली व त्यास वठणीवर आणण्यासाठीं गोवळकोंड्यावर स्वारी करण्यास परवानगी मागितली. परंतु शहाजहानानें प्रथम कुतुबशहास सामोपचाराचें पत्र लिहून जुमल्याचे कुटुंबास ताबडतोब सोडण्याविषयीं फर्माविलें. तें पत्र उशीरां पोहोचलें. मध्येंच कुतुब ऐकत नाहीं

असें पाहून, मीं आपल्या मुलास त्याचेवर पाठविलें आहे तेव्हां पुढें चाल करण्याची परवानगी द्या, असें पत्र लिहून औरंगजेबानें बादशहाकडून स्वारीची परवानगी मिळविली होती; हीं दोन्हीं पत्रें एकदमच मिळालीं. परंतु यांपैकीं पहिलें औरंगजेबानें दडपून दुसऱ्याच्या आधारावर गोवळकोंड्यावर स्वारी करून ता. २३ जानेवारी १६५६ रोजीं म्हणजे १५७७ च्या पौषांत कुतुबचा पूर्ण पराजय केला. यावेळींच औरंगचा विचार गोवळकोंड्याचें राज्य खालसा करण्याचा होता. परंतु त्या हातचलाखीची बातमी दिल्लीस पोहोचून गोवळकोंड्याशीं सल्ला करण्याचे सक्तीचे हुकूम आल्यामुळें नाइलाजानें त्यास तह करून परतावें लागलें.

या कपटीपणापासून जहिरुद्दिन फरूकीसाहेब औरंगजेबाचा बचाव करण्याचा पुष्कळ प्रयत्न करतात. परंतु जदूबाबूंनीं औरंगजेबाचें एक पत्रच परिशिष्टांत दिलें आहे. त्यावरून त्याच्या दुष्ट हेतूवर चांगलाच उजेड पडतो. आपल्या मुलाला लिहिलेल्या पत्रामध्यें औरंगनें "गोवळकोंड्याचें सर्व राज्यच उध्वस्त व खालसा करा, इतकेंच नव्हे तर त्या हलकट कुतूबशीं कांहीं बोलणें करण्याच्या मिषानें गांठ घेऊन त्याच्या मानेवरील त्याच्या शिराचा भार शक्य झाल्यास कमी करा." असा उपदेश केला आहे. या पत्रावरून औरंगजेबाचा कृष्ण उद्देश स्पष्ट आहे व फरूकीचें समर्थन अगदींच लंगडें पडतें.

कुतुबनें मीरजुमल्याची कुटुंबांतील मंडळी स्वारीस सुरवात होण्याचे अगोदरच सोडून दिली होती व त्यांच्यासह जुमला हा यापुढें दिल्लीच्या बादशहाचा एक मनसबदार म्हणून राहिला. त्याला शहाजहाननें ५००० ची मनसब व त्याच्या मुलास २००० रु. ची मनसब दिली. शक १५७८ च्या, आषाढांत मीर दिल्लीस जाऊन पोहोचला. त्याच्या नजराण्यानें व देणग्यांनीं बादशहा व भोंवतालचें सर्व सरदारमंडळ दिपून गेलें. मीरनें बादशहास आदिलशाही व कुतुबशाही व बरीदशाही खालसा करून साम्राज्यास जोडण्याचा सल्ला दिला व बादशहानेंही त्याचा सल्ला मान्य करून त्यासच मोठी फौज बरोबर देऊन या मोहिमेवर पाठविलें. अशा रीतीनें औरंगचा दक्षिणेंतील तिन्ही शाह्या बुडविण्याचा फारा दिवसांचा उद्देश सफळ होण्याच्या मार्गास लागला.

यापुढील मीरजुमल्याचें चरित्र स्वतंत्रपणें तितकेंसें उपलब्ध नाहीं. औरंगजेबाच्या हाताखालीं त्यानें या दक्षिणेच्या स्वारीमध्यें कल्याणी वगैरेसारखे किल्ले व आदिलशाहीच्या उत्तर सरहद्दीवरचा बराच मोठा भाग काबीज केला. परंतु दारानें शहाजहानचें मत वळवून तह करून युद्ध थांबविण्याचा हुकूम दक्षिणेंत पाठविला व लागलेच शहाजहान आजारी पडल्यामुळें औरंगजेबास दक्षिण जिंकण्याचें काम अर्धवट टाकून घाईघाईनें उत्तरेस जावें लागलें. जातांना औरंगनें जुमल्याची नेमणूक नवीन जिंकलेल्या मुलखाची व्यवस्था लावण्याकडे केली. हें वृत्त शक १५७९ भाद्रपदांत घडलें.

यावेळीं विजापुरास मिळविलेला मुलूख गमविणें किंवा राज्य गमविणें या दोहोंमध्यें पहिलें गमविण्यास औरंगजेब सहजच तयार झाला व त्यामुळें स्वतः उत्तरेकडे जावयाचें ठरवून त्यानें मीरजुमल्यास परिंडा घ्यावयास पाठविलें. मीरचा ह्या वेळचा औरंगजेबाजवळचा दर्जा फारच वाढला असून त्याच्या सल्ल्याशिवाय औरंगचें एक पानहि हालत नसे. व पुढील ज्या ज्या कांहीं उलाढाली त्यानें केल्या त्या त्या सर्व मीरच्या सल्ल्याला अनुसरूनच केल्या. याची साक्ष औरंगजेबाचीं खाजगी पत्रेंच देत आहेत. परिंड्याच्या स्वारींत मीरजुमल्यास यश आलें नाहीं व तीन महिने वेढा घालून शेवटीं हात हालवीत परतावें लागलें.

परंतु पुढें वारशाच्या युद्धांत औरंगजेबास मीरचा फारच उपयोग झाला. शेवटीं जुमल्यास बादशहानें दिल्लीस येण्याचा हुकूम केला. तेव्हां दोघांनीं संगनमत करून औरंगनें मीरास कैदेंत टाकलें व ज्यावेळीं त्याचें आसन स्थिर झालें त्यावेळीं जुमल्यास कैदेंतून काढून त्यास मोठमोठे किताब दिले व तशाच मोठ्या मानाच्या जागा जहागिऱ्या देऊन आपला मुख्य वजीर केलें. यापुढील जुमल्याच्या चरित्राच्या भागाचा या निबंधांत विचार करावयाचा नसल्यामुळें हा निबंध येथेंच पुरा केला आहे.

अशा रीतीनें मीरजुमल्याचें शक १५७० ते ८० पर्यंतचें चरित्र हें येथें थोडक्यांत दिलें आहे. मलिकंबरानंतर दक्षिणेंतील मोठा सेनापति व बडा मुत्सद्दी असें मीरजुमल्याचें वर्णन जुने इतिहासकार करीत असतात. पण त्याच्या कर्तबगारीचा उपयोग मलिकंबरप्रमाणें दक्षिणेंतील शाह्यांच्या संरक्षणाकडे मात्र झाला नाहीं. स्वार्थाकरितां त्यानें आपल्या धन्याशीं बेइमानी केली. व स्वतंत्र मुलुख संपादन केला व पुढें संधि येतांच औरंगजेबास मिळून कुतुबशाहीविरुद्ध स्वाऱ्या केल्या. त्याचा खरा उपयोग औरंगजेबास मात्र त्याच्या राज्यसंपादन करण्याच्या उद्योगांत फार झाला व याप्रमाणें दिल्लीच्या दरबारीं औरंगजेबास राज्य प्राप्त करून देण्यांत व तें मिळाल्यानंतर त्याच्या पदरीं मोठमोठीं जबाबदारीचीं कामें करण्यांत त्याची कर्तबगारी दिसून आली.

---

# ३ कोंडे देशमूख

( कै. स. ग. जोशी )

*मौजे कुसगांव तर्फ खेडेबारे येथील पाटीलकी कोंडे देशमूख यांची आहे त्यांतील आठवे तक्षिमेतील पिराजी बिन बावाजी कोंडे यानी आपली आठवी तक्षीम बावाजी बहिलमे मुसलमान यास विकली त्याबदलची हकीकत अशी आहे—

* वाढदिवस २३ वा, शक १८५५.

पुणें–महाबळेश्वर रस्त्यावर पुण्यापासून तेविसावे मैलावर नसरापुराशेजारीं मौजे कामथडी हा गांव आहे. या गावास शिवगंगा ही नदी आहे. कामथडी हा गाव शिवछत्रपतींची मातोश्री जिजाबाई यांचा. तेथें देशमूख देशपांडे यांना हक्कदारी मिळत नसे. सारा हक्क वसूल आईसाहेबाकडे पावत असे. शिवापुरापासून कामथडीपर्यंत शिवगंगेचे पूर्व बाजूची नदीतीरावरील जमीनही जिजाबाई साहेब यांची शेरी म्हणजे खासगी मालमत्ता होय. याचा वसूल करण्यास आईसाहेब यानी नारो त्रिमळ पिंगळे हे कारकून ठेवले होते. त्यावेळी शंकराजी बिन खंडोजी इंगुळकर हा या गावची पाटीलकी करीत होता त्यास कानजी नाईक कोंडे हा त्या गांवांत हात शिरकावण्यास पाहू लागला तेव्हां खंडोजी व शंकराजी पाटील बोलले कीं गांव मातोश्री आईसाहेबांचा येथें तुमचा कांहीं दाखला नाहीं; कुल हक्कदक्क आईसाहेबांकडे. त्यांचा कमावीसदार गावास आहे. आम्ही नाईक. कोंडे यानें सिंहगडचा त्यावेळचा अमलदार शिद्दीअंबर ( शक १५४५ ते १५५५ ) यास सांगितलें कीं देशमुखीचा हक्क पाटील खातो त्यास धरून आणून पारपत्य करावें. शिद्दीनें स्वारी पाठवून इंगुळकरास धरून आणणेचा प्रयत्न केला परंतु पाटलास ही खबर कळून ते स्वारी पोचण्याचे थोडे अगोदर बायकामुलें घेऊन रातोरात गावांतून पळून गेले ते उजाडता आदिलशाही हद्दींत शिरवळचे नजीक पांडे या गावीं गेले तेथेंच ते ८०–९० वर्षे राहिले. नंतर शंकराजीचे पुत्र भिकाजी व नातू शिवाजी हेही पांडे येथेंच नांदले. पणतू हिरोजी हा शाहू छत्रपती यांजवळ पाटीलकीचे वादास उभा राहिला. शंकराजी पाटील पळून गेल्यावर कामथडीची पाटीलकी बावाजी कोंडे देशमूख करूं लागला. या संधीस बहिलमे या आडनांवाचें एक मुसलमान घराणें पुण्याजवळ कात्रज व कोंढवे या गांवची पाटीलकी करीत होतें. त्यांतील कांहीं पुरुष सधन असून सावकारी करीत असत. बावाजी कोंडे यानें त्यास कांहीं पैक्याची नड लागलेमुळें कामथडीची पाटीलकी अल्लीभाई बहिलमे यास विकली. त्याचा मुलगा सुलतान आणि नातू वल्लीभाई यांनीं तें वतन अनभवलें. यावेळीं हिरोजी इंगुळकर हा पाटीलकीस अडथळा करून वादास उभा राहिला. हा वाद शाहूछत्रपतींनीं खेडेबारे हा प्रांत पंतसचीव यांचे हद्दींतील सबब त्यांचेकडे सोपवला. त्यांचे दरबारीं हा वाद दहा बारा वर्षे रेंगाळत पडला होता नंतर छत्रपतींनीं ताकीद केल्यामुळें हें काम नेटास लागलें. बावाजी कोंडे याचा मुलगा पिराजी नाइक कोंडे यानें शेवटीं इंगूळकरास निमे पाटीलकी देण्याचें कबूल केलें. त्यास हिरोजी इंगूळकर बोलला कीं, आजी १०–१२ वर्षे वादापायी खराब जालो आता रवा–दिव्य करीन; खरा जालों तर सर्वच पाटीलकी करीन. खोटा जालों तर गावातून निघोन जाईन. त्यावर हिरोजीने सातारप्रांती खंडोबाची पाली येथें दिव्य केलें. रवा दिव्यांत खरा जाले-मुळें शाहूछत्रपतीनी पिराजी नाइक कोंडे आणि वल्लीभाईचा मुलगा बावाजी यांचे-कडून पाटीलकी काढून ती हिरोजी इंगूळकराचे हवाली केली आणि त्यास महजर

करून दिले. यानंतर बाबाजी मुसलमान पिराजी नाइक कोंडे देशमूख यास म्हणाले की आता आमचे पैक्याची वाट काय ? तेव्हां पिराजी नाइक कोंडे यांनीं पैक्या करता पुष्कळ यत्न केले. परंतु पैका मिळेना. सबब कुसगाव येथील आपली पाटीलकीची आठवी तक्षीम घर वाडा सुद्धां बावाजी वलद वलीभाई यास दिली. याच बहिलमे मुसलमानांचे भाउबंद वाइजवळील खांबटकी घाटाचे पश्चम बाजूस कण्हेरी या गावचे निमे पाटील आहेत. यांचा घरठाणा, तेथें रामदास स्वामींचे शिष्य वासुदेव गोसावी, यांचे मठास लागून आहे. हे पाटील मुसलमान असलेमुळें होळीचे पोळीचा पाटलाचा मान यानीं मठास दिला आहे व मठपतीच होळीस पोळी लावतात. याच बहिलम्यानी कण्हेरीचे मुसलमानांची पाटीलकी सावकारींत खाण्याचा घाट घातला होता परंतु त्या घराण्यांतील एका कर्तृत्ववान आऊबाईनें तो साधू दिला नाहीं. वाईचे विद्यमान पाटलांचेंही आडनांव बहिलमे आहे असें शक १६११ चे कागदावरून दिसून येतें.

---

# ४ भाई राणेखान

(के. पां. न पटवर्धन)

१ पुढील पत्र शक १७०० श्रावण शु. १५, ता. ८ आगष्ट, इ. स. १७७८ चें असून, तें राणेखान वलद फतेखान पठाण याचे संबंधांतील आहे. यांत पिंपळवडी गांव कुटुंबाचे बेगमीस सन सबा सबैनांत म्ह. इ. स. १७७६।७७ त राणेखान यास जागीर दिल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. हा राणेखान म्हणजे महादजी शिंद्याचा जीव वाचविणारा राणेखान पठाण होय. राणेखानाचें देवपूर ( ता. सिन्नर, जि. नाशिक ) येथें, व दुसरें ग्वाल्हेरीस या प्रमाणें दोन घराणीं नांदत आहेत. राणेखान यानीं आपणांस अफगाणांच्या हातून सोडविलें, हें आठवून महादजी शिंदे यांनीं त्यास जहागिरी इनामें देऊन आपल्या खवासखान्यांत उजव्या बाजूस बसण्याचा मान दिला इ. वृत्त प्रसिद्ध आहे. हें घराणें ग्वाल्हेर येथें खवाशीवाले या नांवानें प्रसिद्ध आहे. राणेखान इ. स. १७९१ डिसें. २२ रोजीं मरण पावला.

२. भाई राणेखान यांची वंशावळ खालीलप्रमाणें:--

१ राणेखान फतेखान--१ समशेरखान २ हसनखान
(१) (२) (९)

(२) समशेरखान--१ फतेखान, २ टिपूराजा ऊर्फ हुसेनखान *
(३)

(३) फतेखान--१ राणेखान २ डालेखान*
(४)

४ राणेखान--१ हसनखान २ फतेखान ३ महेताबखान ४ टिंपूराजा ऊर्फ
(५) (६) (७)

हुसेनखान* ५ हयातखान
(८)

५ हसनखान--१ नूरखान २ जमालखान
६ फतेखान-- १ शिकंदरखान २ आश्रफखान ३ मगबूलखान
७ महंताबखान--मनवरखान
८ हयातखान-- राणेखान
९ हसनखान-- समशेरखान- शाबासखान
(१०)

१० शाबासखान--१ हसनखान २ समशेरखान+ ३ जमालखान+
(११)

११ हासनखान--१ राणेखान+ २ अजीमखान ३ अयमतखान

येणेंप्रमाणे या घराण्याची वंशावळ आहे. राणेखानाचीं दोन पत्रें माझे संग्रहांत आहेत. जास्त माहिती देवपूर येथें व ग्वाल्हेर येथें राणेखान भाईच्या वंशजांकडे मिळावी.

मराठी रि. उ. वि. २ पृ. २५४-२५५ वर त्रोटक वंशावळ आहे. त्यापेक्षां वरील वंश विस्तापूर्वक असल्यानें दिला आहे. वर म्हटलें ती सनद येणेंप्रमाणें—

---

*मोडी-अस्सल

श्री { श. १७०० श्रावण शु. १५
इ. १७७८ आगष्ट ८ }

० श्री
श्री राजाराम नर
पति हर्षनिधान मा
धवराव नारायण
मुख्य प्रधान

I Nam
× A ×
Commission 3819

छ. मा अनाम देशमुख व देशपांडे पो कुंभारी सरकार दौलताबाद यांसी माधवराव नारायण प्रधान सुा तिसा सबैन मया व अलफ शके १७०० विलंबी नाम संवत्सरे राणेखान वलद फतेखान पठाण पाटील कसबे देवपूर पो संगमनेर

---

* श. १८३९

सरकार मजकूर याणी हुजूर किले पुरंदर येथील मुकामी येऊन अर्ज केला की आपण बहुत दिवस साहेबाचे राज्यांत एकनिष्ठपणें चाकरी केली. याजकरिता साहेबी मेहरबान होऊन कुटुंबाचे बेगमीस मौजे पिंपळवंडी पो कुंभारी येथील जहागिरीचा अमल सन सबा सबैनांत इनाम देऊन पत्रे करून दिल्ही त्याप्रमाणे आपल्याकडे अमल चालत आहे. त्यास तेथील बाबती सरदेशमुखी सरकारची आहे ते हाली आपणास नूतन इनाम करार करून देऊन जाहागिरीचे अमलाची पेशजीची पत्रे आपल्याजवळ आहेत ती माघारीं घेऊन मौजे मजकूरचा मोकासा व सावोत्रा खेरीज करून जाहागीर व बाबती सरदेशमुखीचे दरोबस्त अमलाची इनामपत्रें भोगवटियास करून दिल्ही पाहिजेत म्हणोन त्याजवरून मनास आणिता याणी सरकारांत बहुत दिवस एकनिष्ठपणें चाकरी केली यास्तव याचे चालवणे जरूर जाणोन याजवरी मेहरबान होऊन यास कुटुंबाचे बेगमीस मौजे मजकूर येथील जाहागिरीचा अमल पेशजी सन सबैनांत इनाम देऊन पत्रे करून दिल्हीं. त्याप्रमाणे याजकडे अमल चालत आहे त्यास ती पत्रे हाली याजवळून सरकारात माघारी घेऊन मौजे मजकूरचे जहागिरीचा अमल पेशजी दिल्हा आहे तो व बाबती सरदेशमुखी सरकारची आहे ती हाली नूतन इनाम करार करून देऊन एकूण मौजे मजकूरचे खेरीज मोकासा व सावोत्रा करून दरोबस्त अमल कुलबाब कुलकानू हलीपटी व पेस्तरपटी खेरीज हक्कदार व इनामदार करून यास इनाम करार करून दिल्हा असे तरी मौजे मजकूर सदरहूप्रमाणे याचे दुमाला करून देऊन यास व याचे पुस्त दर पुस्त इनाम चालवणे दरसाल नवीन पत्राचा अक्षेप न करणे या पत्राची प्रती लेहून घेऊन हे असलपत्र यांजवळ भोगवटियास परतोन देणे जाणिजे छ १४ रजब आज्ञा प्रमाण लेखन

सीमा

---

# ५ मल्हार गणेश याचें आत्मवृत्त

( श्री. गणपतराव गोपाळराव खांडेकर )

*मल्हार गणेश, गणेश संभाजी खांडेकर यांचे पुत्र होत. गणेश संभाजीकडे सन १७४८ व १७५३ मध्यें माळव्यांत कांहीं परगण्यांची कामाविशीचीं कामें असून १७५७ मध्यें त्यांजकडे औरंगाबादच्या बाजूला असलींच महत्वाचीं कामें होतीं. सन १७५९ अखेर त्यांजकडे उत्तर हिंदमधील कामगिरी आली. पाणिपतकालीं ते बुंदेलखंड व अंतर्वेदींत गोपाळ गणेश बर्वे यांचे बरोबर सरकारतर्फे गोविंद बल्लाळ ह्यांचे

* पा. स. १५२

दिमतीस असत. त्यावेळीं गोविंद बल्लाळ व गणेश संभाजी या उभयतांमध्यें वितुष्ट आलें. पुढें ओरिसाप्रांतावरहि अधिकार १७७७ मध्यें गणेश संभाजीकडे बुंदेलखंडांतील हिंदपत-राजाचे पश्चात्, त्यांचे चिरंजीव सरजेतसिंग यांस राज्याधिकार आला तेव्हां मिळाला. त्यांच्या मुख्य कारभारावर पुण्याहून गणेश संभाजीची योजना होऊन त्यांच्या छावणी-करितां बाळाजी गोविंदाचे सरंजामांतील सबंध महोबर परगणा दिला गेला. त्यामुळें तें वितुष्ट वाढलें असावें. व १७७९ मध्यें गणेश संभाजीची छावणी माळव्यांत नरसिंग-गर संस्थानची जुनी राजधानी पाटण जवळ नेवज नदीतीरीं असतांना दादो नारायण महाजनी ह्यांच्या आधिपत्याखालीं बाळाजी गोविंदाचे फौजेनें त्यांजवर त्यांस नकळत छापा घातला. ह्यांत गणेश संभाजी कामास आले. त्या प्रसंगी मल्हार गणेश रणक्षेत्रांत हजर होते. तेव्हांपासून पुढील २२ वर्षांचा वृत्तांत मल्हार गणेश यांनीं आपल्या मिती अधिक जेष्ट वा। ३ शनिवार संवत १८५८ तारीख ३० मे सन १८०१ चे पत्रांत आपले बंधु जगनाथ गणेश व माधव गणेश ह्यांस लिहून कळविला. तो इतिहासोपयोगी साधन म्हणून महत्वाचा वाटतो. पत्रांत केवळ घरगुती मजकूर आहे तो वगळून इतर उपयुक्त भाग संकलीत करून मंडळास सादर करीत आहे. पत्राचा कागद जीर्ण होऊन कांहीं ठिकाणीं फाटल्यामुळें जो मजकूर गहाळ झाला त्याबद्दल व सोडलेल्या मजकुराबद्दल सारांशांत विशेष खुणा केल्या आहेत.

मल्हारराव गणेश ह्यांचें आत्मवृत्त.

" आज तीर्थरुप अण्णा कैलासवासी जाहल्यास बावीस वर्षे झाली...जेव्हां तीर्थरुप कैलासवासी जाहले तेव्हां आम्ही मातुश्रीबाई सुद्धां समागमेंच होतों. आणि तुम्हीं बऱ्हाणपुरास मोठीबाईसुद्धां होतां जेव्हां लष्कर लुटलें तेव्हां अवघा सरंजाम लुटीत गेला. आणि मातुश्रीची पालखी धरून घेऊन गेले. त्या फौजेंत तीर्थस्वरूप दादो नारायण कैलासवासी होते. ते बाळाजी गोविंदाकडून लढाईस आले होते. आणि फौजेत तीर्थस्वरूप गोपाळ संभाजीनाना कैलासवासी होते. त्यांनी पालखीसुद्धां मातुश्रीस नानाच्या गोटांत पाठवून दिलें. आणि आम्हास भाला लागला होता, ते आम्ही व पांडुरंगभट वगैरे दहा पंधरा स्वार निघोन चाळीस कोसावर पाणी मिळालें होतें.—मग आम्ही तराणा गांव होळकरांचा आहे तेथवर पांडुरंगभट व आम्हीं एकत्र राहिलों. मग आम्ही तीर्थरूपाचे खबरेकरतां तराण्यास राहिलों आणि पांडुरंग भट बऱ्हाणपुरास गेले. त्यानंतर श्रीमंत कैलासवासी अहिल्याबाईस भेटलों. बाई दुसचे वचन बोलली कीं, " तुमचे तीर्थरुप पांच कोसावरून इंदुरास गेले आणि भेट घेतली, तुम्ही सरदार आहात"...मग आम्ही श्रीमंत मातुश्री आनंदीबाईसाहेब व श्रीमंत बाजीरावसाहेब पांच वर्षांचे होते. ते आम्ही राजश्री राजाराम गोविंद दिवाण ह्या वेळेस होते. ते आम्ही त्यांस पत्र पाठविले ते आम्हास जपतीच्या फौजेंत भेट जाहली होती. तीर्थस्वरुप

बाबा[1] आम्हांस समागमे घेऊन गेले होते. ह्या समयींची भेट होती. त्यांनी फार खुशी होऊन पत्र पाठविले कीं, "तुम्ही लौकर या, श्रीमंताची भेट मी करवीन." ह्या पत्रावर आम्हीं महेश्वराहून मंडलेश्वरास गेलों. मग त्यांनीं ××× पुढें कोसभर येऊन भेट घेतली. आणि आम्हास लष्करांत घेऊन गेले. ते श्रीमंत मातुश्री साहेबांची भेट करविली. आणि मातुश्री साहेबी फार खातरजमा आमची केली. त्याजवर मग श्रीमंत दादासो आले. ते बाईसाहेबासुद्धां सुरतेस गेले...आम्ही इंदुरांस आलों. आणि मातुश्री आमच्या शोधा करतां नानाचे येथून आम्हाजवळ इंदुरांस आली. तीर्थस्वरुप नाना कुंटुंबासुद्धां देसी गेले मग आम्ही...कैलासवासी तुकोजीराव होळकरास भेटलों. ते उठोन भेटले. बरे प्रकारे खबरसमाचार पुसला. ते इंदुराहून देशास कूच करून गेले. तीर्थस्वरुप तात्या[2] अहिल्याबाईजवळून आले. आम्हास सांगितलें त्याचप्रमाणें त्यांस सांगितलें. आम्ही इंदुराहून कूच करून वैशाखांत सागर प्रांतीं आलों. तेथें खुरईस राजश्री गोविंद आप्पाजी सपरे भावजी दिवाणगिरीच्या कामावर[3] होते. त्यांनीं आमचे वर्तमान ऐकिलें ते येऊन भेटले आणि आम्हास सांगितलें कीं, "तुम्ही सर्व प्रकारें बेसरंजाम आहांत आणि हे दिवस गरमीचे. आतां चातुरमास बरसायेत जवळ आली. त्यास तुम्ही चार महिनें येथें राहा. दसरा झाल्यावर मग जिकडे जावयाचें असेल तेथें जा." तेव्हां आम्ही तेथें त्यांजवळ राहिलों. आम्हास त्यांनीं तीन वर्षें फार ममतेकरून ठेविलें. हिंदुस्थानांत काळ पडला होता. रुपयाचे पांच शेरप्रमाणें धारण होती. त्याकरतां आम्हीं अधिक राहिलों. त्यानंतर स्वस्त जाल्यावर आम्ही हिंदुस्थानांत आलों. आग्रयावर श्री पाटीलबावा शिंदे कैलासवासी किल्यास लागले होते. त्या समई आम्ही लष्करांत आलों. परंतु आम्हाजवळ स्वारी कांहींच नव्हती. त्यामुळें पाटीलबावांस न भेटलों. ॥ श्री ॥ मथुरेच्या मुक्कामीं गोसावी राजे उमरावगीर यांची भेट केली. वळख पहिलीच होती. त्यांनीं समयासारखे सलूक केला. दोन घोडी येक उंट व डेरा एक दिला.........परंतु त्याचीही जागा खुल्यावर होती त्यांजजवळ पांच वर्षें आम्ही राहिलों. त्याची जागा सुटोन गेली ते पळून सोपे क्षेत्रास आपले फौजे-सुद्धां राहिले आणि पाटीलबावाची त्यांची मरजी न पटली. त्याजवर आग्र्यास इसमाईल बेग लागला. राजश्री लखबादादाची आणि इस्माईल बेगची लढाई लागली. तेव्हां मिरजाच्याकडून राजे उमरावगीर किल्ल्यावर आले होते. तेव्हां पत्रांत राजश्री लखबा-दादांस पत्रें लिहिलीं. तेव्हां दादांनीं आम्हांस किल्ल्यांत बोलाविले दादाची भेट आमची झाली. भेटी झाल्यावर आम्ही राजा उमरावगिरची भेट करविली. पंधरावीस दिवस गोष्टी लागल्या. किल्ला खाली करावयाचा त्याजवर पाटीलबावांची फौज पन्नास

---

१ दत्तात्रय गणेश, २ विनायक गणेश, गणेश संभाजीचे पुत्र

३ खुरईस सपरे मंडळीकडे अद्याप जो एक बाग चालत आहे त्यास दिवा-णाचा बाग म्हणतात.

साठ हजार आली. राजा उमरावगीर धरले गेले. फौज त्यांची लुटली + + + सून दादाच्या येथें किल्ल्यांत आम्ही गेलों होतों आणि + + + लष्करांत होती ती अवघी लुटली गेली आणि + + + लखबादादानी सांगितलें कीं, " तुम्ही आमचा कारकून + + + घेऊन राणेखां भाईच्याजवळ जा आणि लढाई न होऊ पावे " तेव्हां आम्ही नावेवर बसून आलों. ते तेथें तोपर्यंत राजा उमरावगीर धरले गेले आणि लष्कर लुटले गेले. मग आम्हास फौजेंत जातां न बनले न किल्ल्यांत जातां बनले. तेव्हां आम्ही मातुश्रीबाई सोरवेंस होती ते आम्ही आगऱ्याहून सोरवेंस आलों. तेथें यमुनेवर रोहिला गुलाम कादर पडला होता त्याचे लष्करवाल्यानें आम्हांस लुटलें. तसेच आम्ही सोरवेस आलो. आणि राजा उमरावगीर पाटीलबावाचे येथून सुरवेंस आलों. फिरून त्यांनीं आम्हांस बोलाविलें. त्याजवर पाटलिबावांनीं गोसाव्यास फिरून प्रगणे दिल्हे, तेव्हां आम्ही फिरून त्याजजवळ राहिलों. फिरून प्रगणे लुटले. आणि राजाचा पाटीलबावाचा बिगाड जाला. त्यांजवर आम्ही दोन वर्ष त्याजवळ राहिलों. मग त्यांची सरदारी बिगडली. ते तर पहाडावर रोजगारास गेले. आणि आम्हीं सोरोंस राहिलों एक घोडी मात्र आम्हाजवळ + + + तेव्हां + + + नबाब वजीरुल मुमालीक मरहूम[४] + + + होते. व राजे टीकेतराय दिवाण होते. – – – मोंगलाई दरबार. परंतु ईश्वर इच्छेकरुन भेटीचा योग घडला. चार वर्षें रोजगार राहिला तदनंतर दिवाण व नबाबाशी बिगाड जाला. ते आम्ही राजा टीकायतरायाजवळ पांच वर्षे बेरोजगार होऊन त्या समागमें खराची खालीं आलों ...घोडी पांच होती. ती ब्राह्मणास दान करून दिली...... त्यामध्यें नबाबसाहेब व महाराजसाहेब दोघे देवआज्ञा जाहले. या बखेड्यांत आम्हीं अधिक खराब झालों...आम्हांस...लखनौस राजा टीकेतरायचा तलाव सीतलाचा बाग सीतलेच्या मंदिराजवळ आमची हवेली आहे. या पत्त्यावर पत्र लिहिला तें आम्हाजवळ पोंहचेल."[१]

---

## माळव्यांतील स्त्रीरत्नें

# ६ राणी मैनाबाई

( **चिंतामण बळवंत लेले,** बी. ए., सं. धार. )

*माळव इतिहासांतर्गत परमार–पवार घराण्याच्या इतिहासाला भारताच्या इतिहासांत अनेक दृष्टीनें महत्वपूर्ण स्थान दिलें पाहिजे. माळव प्रांताला भारताचें केंद्र

४ आसफुद्दौला, लखनऊचे. * श. १८६५ १ ह्या मजकुरांतील अवतरण–चिन्हें, विराम इ. मूळ लेखांतील नसावींत, मंडळाकडे आली ती नकल तशीच वर घेतली आहे.

या दृष्टीनें भौगोलिक मूल्य तर आहेच, परंतु मध्ययुगीन काळांत परमारवंशयि राजांनीं धार व उज्जयिनी या राजधानीच्या नगरांत वास्तव्य ठेवून आपलें सम्राटपद कित्येक शतकें अजिंक्य म्हणून कायम टिकविलें होतें, याची साक्ष त्या काळचे शिलालेखादि अवशेष आजही पटवितात. या दृष्टीनें त्या काळचा इतिहास वाचकांस रोचक जरी वाटला नाहीं तरी भावी पिढीस मार्गदर्शक व राष्ट्राच्या उज्ज्वल भवितव्यतेस अवश्य पोषक होईल, यांत तिळमात्र संशय नाहीं. याच परमार घराण्याचे वंशजांनीं पवार या नांवानें सतराव्या शतकाचे सुरुवातीपासून हिंदुपद्पादशाहांचे आद्य संस्थापक छत्रपति शिवाजी महाराज यांनीं अंगिकारलेल्या राष्ट्रकार्यास आपल्या शौर्यवीर्यादि गुणांच्या जोरावर सहकार्य दिलें व पुढेंही शाहु महाराजांचे कारकीर्दीत बाजीरावाच्या हिंदुस्थानांतील मराठा राज्याच्या विस्तारकार्यांत या पवार घराण्याचें प्रमुख अंग होतें. व हिंद्वी स्वराज्याचें रूपांतर साम्राज्यांत झालें. अशा पवार घराण्यांतील एका आदर्श महिलेचें जीवनचरित्र आज या त्रोटक लेखांत देण्याचें ठरविलें आहे.

पेशवाईच्या उत्तर काळांत पुणें दरबारीं जशी साडेतीन शहाण्यांची ख्याती होती तद्वतच माळव्यांत होळकर घराण्यांतील पुण्यश्लोक देवी अहल्याबाई, धारच्या राणी मैनाबाई पवार, शिंदे घराण्यांतील सुप्रसिद्ध बायजाबाई व इंदूर येथील प्रसिद्ध जोग उर्फ किबे घराण्यांतील रखमाबाई यांचीं नांवें कर्तृत्ववान् महिला म्हणून प्रसिद्धीस पावलीं होतीं. युद्धकुशल यशवंतराव पवार पानिपतच्या (१७६१) संग्रामांत बेपत्ता झाल्यावर त्यांचे पुत्र खंडेराव पवार हे धारच्या गादीवर सनदशीररीतीनें बसले. त्यांच्या निधनोत्तर त्यांचे चिरंजीव आनंदराव पवार २ रे यांचा जन्म दक्षिणेंत कवठेगांवीं ता. ४ डिसेंबर १७८२ (कार्तिक वद्य ३० शक १७०४) रोजीं झाला. राणी मैनाबाई ही आनंदराव पवार यांची ज्येष्ठ पत्नी होय. मैनाबाईचा जन्म बडोदें येथें ता. २८ जून १७८५ (ज्येष्ठ वद्य ६ शक १७०७) रोजी आपल्या मावशीच्या घरीं झाला. मैनाबाईचें मूळ नांव 'दुर्गा' असें होतें. श्रीमंत गोविंदराव यांची पत्नी गहनाबाई यांच्या बहिणीचीच दुर्गादेवी कन्या असल्यामुळें तिचें बाल्यावस्थेंतील लालनपालन व शिक्षण गोविंदराव गायकवाड यांचे देखरेखीखालींच झालें. त्यांचीच कन्या नर्मदाबाई धारच्या खंडेराव पवारास दिलेली असल्यामुळें आनंदरावांच्या संगोपनाची खास जबाबदारी गोविंदराव गायकवाड यांचेवर ओघानेंच आली. तेव्हां मैनाबाई व आनंदराव यांचें बालशिक्षण बडोदा येथेंच बरोबर झालें. वयाचे तेरावे वर्षी बडोदें येथेंच आनंदराव पवारांचा विवाह मैनाबाईशीं ता. १४ मे १७९५ (वैशाख शु. १० गुरुवार शक १७१७) रोजीं मोठ्या थाटामाटानें साजरा झाला. आनंदरावाच्या अज्ञानावस्थेंत संस्थानचा कारभार रंगराव महादेव ओढेकर हे पेशव्यांचे संमतीनें पाहात असत. या लग्नसमारंभास तेही जातीनें धारच्या अनेक प्रसिद्ध दरखदार मंडळीसह हजर होते. अहल्याबाईनें आपले वतीनें सखाराम

पांडुरंग यास अहेर देवून बडोद्यास पाठविलें होतें. त्यांनीं पाठविलेल्या आपल्या खबरें " पोवारांच्या भेटी झाल्या, जांवयास वस्त्रें, अंगठी, शिरपेंच व घोडा दिला " असा उल्लेख केला आहे. लग्नसमयीं दुर्गादेवीचें वय सुमारें दहा वर्षांचें होतें.

मातृनिधनोत्तर आनंदरावांनीं धारेस जाऊन राज्यकारभार आपले हातीं घेण्याचें ठरविलें. आजोबांनीं पोरवय म्हणून तांतडी करून न जाण्याची पुष्कळ आगळ घातली परंतु तिचा कांहीही उपयोग झाला नाहीं. तत्पूर्वीच बडोद्याहून अमीन जमादार व हरिसिंग पागादार यांची धारेस ससैन्य रवानगी झाली होती. (ब. रा. वेचें भाग ६ ले. ३२)

शेवटीं बडोदा सोडून ता. ३० मे १७९८ या दिवशीं आनंदरावांनीं झाबव्यास येवून मजलसराय व गोकूळ पारख यांचे हातीं रंगराव ओढेकर यांचेकडे रथ वगैरे सामान पाठविण्यास निरोप पाठवून दिला. मालकाचे हातांत राज्यशकट देण्याची इच्छा नव्हती. त्याकरिता त्यानें आनंदरावांच्या आगमनांत सत्तेच्या जोरावर अनेक अडचणी उत्पन्न केल्या. परंतु आनंदरावांनीं झाबव्याच्या राण्याच्या मदतीनें धारेस येऊन राजसत्ता आपले ताब्यांत घेतली. उघड उघड मालकास विरोध होऊं नये, या हेतूनें रंगराव महादेव यांनीं धारेंतून तात्पुरतें पलायन केलें. कांहींशी स्वस्थता प्रस्थापित झाल्यावर मैनाबाई धारेस आल्या. इ. १८०१ ते १८०७ या लहानशा कालमर्यादेंत धारच्या इतिहासांत अनेक स्थित्यंतरें झालीं, त्या सर्वांचें विवरण या जीवनवृत्तांतांत अप्रस्तुत होय. पण या महत्त्वपूर्ण घडामोडीच्या काळाचें थोडक्यांत वर्णन करावयाचें झाल्यास आनंदराव पवार यांच्या एका पत्रांतील उतारा उद्बोधक म्हणून खालीं देत आहे. "हली सारे दवलतीत अडीच लक्षे उनपन होता कठीन आहे. भरम मात्र आहे. जे होतें ते घेवून गेले चाळसा वरसाचे. त्यात एक दिवाणीगिरीचा दरख आज दिवाणाचा दोन करावयाची आज्ञा. त्यांनीं उगें बसावें. बाबाजींनी काम आज्ञेप्रमाणें करावें, हें कैसे चालते ! दोन दोन दरख वेतनें मी कोठून पुरे. पाडूं ! दवलत किती !" इ. (ब. रा. वेचें भाग ६ ले. ४५). ई. स. १८०७ चे सुरुवातीपासून आनंदरावाची प्रकृति एकाएकी बिघडली. उपचार करण्याकरितां बडोद्याहून सोमेश्वर वैद्य तथा हकीम यांची ताबडतोबीनें रवानगी करण्यांत आली. किंबहुना गहनाबाई गायकवाड यांनीं रामराव काशी ( सिक्केनवीस ) यांना आनंदराव व मैनाबाई यांस बरोबर घेवून बडोद्यास येण्याविषयीं लिहिले. गहनाबाईचा डाकूरजीस नवस फेडण्याचा राहिला होता. अखेरीस सर्व इलाज निष्फळ ठरले व आनंदराव पवार यांस ता. ९ जून १८०७ ( जेष्ठ शु. ३।४ सं. १८६४ चैत्रादि ) रोजीं मृत्यू आला. राणी मैनाबाईच्या संकटमालिकेस ऐन उमेदींतील वैधव्यापासून प्रारंभ झाला. दुःखांत समाधानाची गोष्ट इतकीच कीं, मैनाबाईस त्यावेळीं दिवस लोटले होते. त्यामुळें पुत्र झाल्यास गादीला मालक होवून बिघडलेली राज्याची घडी परत नीट बसविता येईल, या भावी आशेवर तिनें वैधव्य दुःख पचवून अत्यंत गांभीर्यानें राज्यकारभाराची जबाबदारी स्वतःकडे

घेतली. राज्याला मालक नाहीं, ही संधी साधून लेकवळा मुरारराव पवार यानें धुमाकूळ माजविण्यास प्रारंभ केला. होळकर, शिंदे तथा पेंढारी लोकांनींही धार राज्यांत वेळोवेळीं आक्रमण करून मुलख बेचिराख करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. अशा निराधार विरोधी परिस्थितींत तिनें बडोद्यास साहाय्यार्थ याचनापत्र लिहिलें. तिकडून ताबडतोब सखाराम चिमणाजी, बाळाजी लक्ष्मण, बापू रघुनाथ, रामचंद्र बाबूराव, सदाशिवभट पुराणिकआदि मंडळींची ससैन्य रवानगी करण्यांत आली. उद्भवलेल्या बावटळीचा बिमोड केल्यावर मैनाबाईस बाळंतपणाकरितां संरक्षित अशा मांडवगडावर पोहोच-विण्यांत आलें. तेथें बाजबहादुरच्या महालांत ता. ११ डिसेंबर १८०७ ( मार्गशीर्ष शु. १२ शक १७२९ ) रोजीं मैनाबाई प्रसूत होवून गादीचा वारस जन्मास आला. या बातमीनें मुरारराव पवाराची बरीच निराशा झाली. त्यानें कपटव्यूह रचून यापुढें गादीशीं इमानें इतबारें वागण्याची साखर पेरून, बारश्याचा समारंभ झाल्यावर राणी मैनाबाईस बाळराजासह धारेस येवून राहाण्याची गळ घातली. बाळराजाचा घात करून आपणाकडे राज्याची मालकी हस्तगत करण्याची महत्वाकांक्षा सिद्धीस तर गेली नाहींच. उलट अत्यंत हलाखीच्या स्थितींत त्याला धारेंतून पळून जावें लागलें. परंतु राणीवरील संकटपरंपरा अद्यापि संपली नव्हती. इ. स. १८१० सालीं एकाएकी बाळराजाला मृत्यू आला. त्यामुळें मैनाबाईवर राज्याची जबाबदारी व भावी राज्य-व्यवस्थेची चिंता येऊन पडली. मैनाबाईच्या अशा असाहाय स्थितींत दौलतराव शिंदे, लाडाबाई व तुळसाबाई होळकर यांनीं सांत्वनपर पत्रें पाठवून आपली सहानुभूति ( व्यक्तिगत ) व्यक्त केली. परंतु यावेळीं पोकळ सहानुभूतिपेक्षां अधिक जिव्हाळ्याच्या साहाय्याची आवश्यकता होती. तो जिव्हाळ्याचा आधार मैनाबाईस आपली मावशी गहनाबाई गायकवाड यांचेकडून मिळाला. बाळराजाच्या मृत्यूनें तर गहनाबाईवर दुःखाचा डोंगरच कोसळला. त्यांनीं धारेस रामराव काशी यास कळकळीचें पत्र पाठवून कळविलें कीं, " चि. दुर्गाबाई तरे लेकरू, आता सर्व प्रकारे भरवसा तुमचा; त्याअर्थी विशेष काय लिहिणे. कोणाच्या भरोश्यावर न राहता दोन्ही किल्ल्याचा बंदोबस्त ठेवावा. तुम्ही पिढीजाद सेवक. त्याअर्थी पवाराचें दौलतीस तुम्हाशिवाय दुसऱ्यास कळवळा येणार नाहीं." [ शिकेनवीस दप्तर ] धार संस्थानची अशी स्थिती पहातांच मुराररावानें फिरून वर डोकें काढण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याच्या त्याहि प्रयत्नास यश आलें नाहीं. शेवटीं ता. ३० जुलै १८१६ रोजीं त्याला मृत्यू आला. तत्पूर्वीच मैनाबाईनीं आपली बहीण ठकाबाई शिंदे ह्यांच्या मुलांस-रामचंद्रराव २ रें या नामाभिधानानें ता. १७ जून १८१० रोजीं यथाविधी दत्तक घेतले होते. त्यांचा विवाह बायजाई शिंदे यांच्या नातीशीं ( सख्या राजा ) इ. स. १८२१ त झाला. हा लग्नसोहळा ग्वाल्हेर येथें मोठ्या थाटामाटानें साजरा करण्यांत आला. लग्नांत एकूण ३२५३९५-१४-६ खर्च झाला. नूतन वधूचें नांव अन्नापूर्णाबाई ठेवण्यांत आलें.

आतां मात्र राणी मैनाबाईस चार दिवस विसाव्याचे आणि समाधानाचे लाभले. संस्थानचा राज्यकारभार त्यांचेच सल्ल्यानें चालत असे. याशिवाय मैनाबाई आपल्या खासगीचा कारभार ईडरचे वेणीराम भूधर यांचे साह्यानें स्वतः मुखत्यारीनें पहात असत. त्यांचा स्वतंत्र शिक्का असे. त्यांचा दैनिक कार्यक्रम अनुकरणीय असाच होता. प्रातःकाळीं उठून स्नानोत्तर त्या गोप्रदान, तिळपात्र ताह्मण, सोन्याची टिकली इत्यादि दान, तसेंच कपिलापूजन व भागवतश्रवण करण्याचा त्यांचा नित्य परिपाठ असे. उरलेलें आयुष्य त्यांनीं धर्मकृत्यांत घालविलें म्हटलें तरी चालेल. त्यांना फक्त तपकीर ओढण्याची संवय होती. धार येथील प्रसिद्ध आनंदेश्वर मंदिर बांधण्याचें काम इ. स. १८२६ ते १८३४ पर्यंत चाललें तें त्यांनीं आपल्या पूज्य पतीच्या स्मरणार्थ बांधलें. मंदिर बांधण्यास एकूण रु. ४१,१७४–१४–९ खर्च झाला असून ता. ९ जून १८३५ या दिवशीं त्यांत शिवलिंगाची स्थापना करण्यांत आली. बांधकाम होत असतांना वेणिराम भूधर यांनीं अतोनात परिश्रम घेतले. यास्तव मैनाबाईनीं त्यास ता. २४ जून १८३४ रोजीं सत्कार करून पोषाख, सोन्याची कंठी बक्षीस दिली. त्यांच्याच देखरेखीखालीं प्रसिद्ध टेकडीवरील कालिकेच्या पायथ्याचें काम सित † अशरीनचे सालीं रु. ९३१८–७–९ त झालें. याशिवाय धार येथील दुर्गाविनायकाचें मंदिर (स्वतःचे स्मरणार्थ), पंढरपूर येथील पद्मावती मंदिराचा सभामंडप, काशी येथील आनंदेश्वर, आपले गुरु वेदमूर्ति विठ्ठल शिवराम पैठणकर यांची पैठण येथील समाधि इत्यादि अनेक कामें करून कित्येक मंदिरांना व ब्राह्मणांना पूजेनिमित्त वर्षासनें करून दिलीं. या देणग्या आजही त्यांचे वंशांत चालू आहेत.

आपल्या उत्तर आयुष्यांत मैनाबाईनीं पुष्कळ यात्रा केल्या. इ. स. १८३१ त त्यांनीं महायात्रा केली. बरोबर बराच नातेवाईक, सरदार मंडळींचा जमाव होता. उज्जयिनी, चित्रकूट, गया, काशी उरकून त्या धारेस परत आल्या. या यात्रेचा एकूण खर्च रु. १३६१८४–९–९ आहे. मैनाबाईनीं वाटेंत अनेक मंदिरांचें दर्शन घेतलें. सदर याद मोठी मनोरंजक आहे. उज्जयिनी, चित्रकूट, गया व काशी येथें त्यांनीं ब्राह्मणभोजनें केलीं व दुसऱ्या अनेक मंदिरांचे ठिकाणीं शिधा व दक्षणा ब्राह्मणांस वांटली. क्षेत्र काशी येथें वैशाख शु. १३ ते वद्य ८ पर्यंत २५८४ ब्राह्मणांना अन्नसंतर्पण करून विश्वेश्वरास बिल्वपत्राची लाखोली वाहिली. गयेस तुळशीचा लक्ष वाहिला. मूळचंद गयावलाचें आदरसत्कारानें पूजन केलें. पूजनाप्रीत्यर्थ ताळेबंदीं रु. ८८८४ खर्च पडला आहे. प्रयागराज येथें तिळहोम व दररोज प्रयागमहात्म्य पुराण श्रवण करण्याचा परिपाठ होता. काशी येथें सोमवती, एकादशी, प्रदोष, दंपतीपूजन वगैरे व्रतांचें उद्यापन केलें. या महायात्रेंत दक्षणेप्रीत्यर्थ एकंदर १९८४२–१२–६ रु. खर्च झाला. प्रयाग येथें राणीनें वेणीदान करून प्रयागवळची सत्कारार्थ मिरवणूक काढून आदरानें बोळवण केली. धारेस आल्यावर मैनाबाईनें गंगापूजनाचा समारंभ मोठ्या थाटानें

† श. १७–४६=१८२५

साजरा केला व संस्थानांतील सर्व मंडळींना प्रसाद दिला. इतकेंच नव्हे तर इंदूर (सुभेदार मल्हारराव होळकर), लष्कर (जनकोजीराव शिंदे), देवास (रुक्मांगदराव व आनंदराव पवार), जोबर (सबळसिंग), रतलाम आदि संस्थानिक व इतर जमिदार मंडळीकडेहि प्रसाद पोहोचविला. धार येथें त्यांचा निवास आनंदेश्वर मंदिरांत असे. इ. स. १८१९ सालीं धार संस्थानशीं ईस्ट इंडिया कंपनीशीं दोस्तीचा तह सर जॉन मालकम साहेब यांचे वतीनें झाला. राणी मैनाबाईस मालकम साहेबांनीं आपली बहीण मानले होते. ह्यांची दुःखद कहाणी ऐकून साहेबमजकुरास फार खेद होत असे. अशा रीतीनें मैनाबाईंची कालक्रमणा धार्मिक वातावरणांत व्यतीत होत असतां एकाएकीं ता. १८-१०-१८३३ रोजीं रामचंद्रराव पवार यांना मृत्यू आला. फिरून गादीला वारस कोण हा कठीण प्रसंग राणी मैनावतीवर येऊन ठेपला. गहनाबाई गायकवाड, बायजाबाई शिंदे आदींच्या सल्ल्यावरून राणी अन्नपूर्णाबाई यांनीं मळठण घराण्यांतील श्रीमंत यशवंतराव ऊर्फ भाऊसाहेब पवार यांचे ज्येष्ठ चिरंजीव मल्हारराव यांस ता. २० एप्रिल १८३४ रोजीं दत्तक घेतले. हेच द्वितीय यशवंतराव होत. यशवंतरावांच्या बाल्यावस्थेंत मैनाबाईंनींच राजशकट चालविला. पण पुढें गृहकलहाग्नीनें पेट घेऊन चांगलेंच उग्र रूप धारण केलें. त्यामुळें मैनाबाईंनीं अति कष्टी होऊन दक्षिण यात्रेस जाण्याचा निश्चय केला. ता. ११-१०-१८४० रोजीं त्यांनीं आपल्या दक्षिण यात्रेला आरंभ केला. ओंकारेश्वराहून राक्षसभुवनास शनिदर्शन, वेरूळ, नेवासें, पैठण, तुळजापूर, नरसिंगपूर, बार्शी, जेजुरी, पुणें, आळंदी, देहू, भिमाशंकर, वाघाळे, मळठण, जातेगांव, कवठे, नाशिक, त्र्यंबकेश्वर, सप्तशृंगी उरकून त्या धारेस परतल्या. दक्षिण यात्रेस एकूण रु. ६३३७६-७-० खर्च आला. महत्त्वाचे क्षेत्रीं मैनाबाईंनीं ब्राह्मणभोजनें केलीं व बहुतेक ठिकाणीं दक्षणा वाटली. खास पंढरपूर येथें राणीचा मुक्काम महिना सवा महिना होता. पंढरपुरास एकूण रु. १४५६१ खर्च झाला. त्यांनीं दागदागिने व पोषाख देवास अर्पण केले. यावेळींहि त्यांचेबरोबर बरीच आप्तमंडळी होती. गृहकलह-प्रसंग रेसिडेंट क्राडवेल यांचे मध्यस्थीनें निकालांत निघाला.

वरील अत्यंत त्रोटक विवेचनावरून धारच्या राणी मैनाबाईच्या जीवनक्रमाची कल्पना वाचकांस येईल. या खडतर जीवनाचा उत्तरार्ध ईश्वरचिंतन, भजनपूजन, दानें इत्यादि धर्मकृत्यांनीं परिपूर्ण भरलेला आहे. त्या वेळचा पत्रव्यवहार हृदयंगम असून, त्यामुळें वास्तविक परिस्थितीचें यथातथ्य चित्र डोळ्यासमोर उभें राहतें. ता. २७ जुलै १८४६ रोजीं मैनाबाईंची सूनही दिवंगत झाली. सुनेच्या मृत्यूनें मैनाबाईंवर जबर आघात बसला. कांहीं दिवस अस्वस्थ राहून मैनाबाईंनीं आपली इहलोकची यात्रा भाद्रपद शु. १ मंदवासर* (इहिदे खमसैन मयातैन व अलफ) आपल्या प्रिय आनंदेश्वर मंदिरांतच संपविली. मृत्युसमयीं त्यांचें वय सुमारें ६५ वर्षांचें होतें. निधना-

* श. १७७२ इ. १८५० सप्टेंबर ७

पूर्वी त्यांनीं एक सहस्त्र गोप्रदानाचा संकल्प केला होता. उत्तरक्रियेप्रीत्यर्थ एकूण रु. १४७३९-३-६ खर्च झाला. शोकनिदर्शनार्थ जातीनें होळकर, देवासकर, बरवनगडकर, कृष्णराव दादा इंदूरकर, उदेगीर महंत महेश्वरकर, इंदूरच्या रखमाबाई किंबे ( जोग ) इत्यादि मंडळी धारेस आली होती.

अशा धीरोदात्त, धर्मिष्ठ राणीचें विस्तृत चरित्र भावी पिढीस खचित उद्बोधक होईल यांत संशय नाहीं.

---

## २ शिल्प चित्रकला

# ७ सोळा हातांची शिवमूर्ति

( चिं. ग. कर्वे )

*मूर्ति तांब्याची सुमोरें नऊ इंच उंच आहे. मागें श्रीचक्रांकित प्रभातारेण आहे. ही समवंग ठेवणीची ( सरळ, ताठ, समपादसूत्रापासून खालीं किंवा वर कांहीं च्युति न झालेली ) शिवमूर्ति आहे. अशीच समवंग मूर्ति कोलंबो म्यूझियममध्यें शिवसूर्याची आहे. आवंग, समवंग व प्रतिवंग अशा तीन ठेवणींपैकीं शांतस्थिति दाखविण्याच्या कामीं या समवंग ठेवणीचा उपयोग चांगला होतो.

मूर्तीभोंवतीं जें प्रभामंडल किंवा ज्वालामंडल आहे तसें बहुधा तांडवनृत्य करणाऱ्या नटराजाभोंवतीं असतें. मंडलाला वर दैत्यमुख आहे. ही मूर्ति ऊर्ध्व तांडव-पाय धरून नाचणें-नटराजाची नाहीं हें उघड आहे. प्रभामंडलांत श्रीचक्र आहे.

शैवमूर्ति-शिल्पाच्या नियमाप्रमाणें हिक्कासूत्रा ( खांदे-मान यांची रेषा ) वर हात नाहींत. हात सोळा आहेत. नटराजाला चार, दहा, बारा, किंवा सोळा हात असल्याचे दाखले आहेत. प्रत्येक हातांत आयुधें आहेत. सोळा हातांच्या मूर्तीच्या हातांतील आयुधांची यादी पुढील श्लोकांत आहे.

### अथ त्रिपुर-तांडव-ध्यानम्

देर्भिः षोडशभिर्युक्तं वामेगौरीसमाश्रितम् । स्कंदं दक्षिणपार्श्वे तु सव्यहस्ते धृतांजलिम् ॥१॥ अभयंडमरूं चैव वज्रं शूलं च बिभ्रतम् । पाशं टंकं तथा दंडं नागं वै दक्षिणे करे ॥ २ ॥ सव्यानुगं करं चैव वामे पूर्वकरं तथा । अनलं पुस्तकं चैव वरदं केतुखेटकम् ॥ ३ ॥ घटां चैव कपालं च वामपार्श्वेष्टभिः करैः । सर्वलक्षणसंयुक्तं शेषं प्रथमनृत्तवत् ॥ ४ ॥ शैवकारणागमे-सप्ततांडवमूर्तिस्वरूपाणि

ही मूर्ति 'अज्ञातवासी' संग्रहांतील आहे. त्यांनीं दाखविण्यास दिल्याबद्दल त्यांचा आभारी आहें.

---

* पा. स. १३।६२

# ८ अष्टादशभुजा दशमुखा महिषासुरमर्दिनी

( श्री. य. खु. देशपांडे, यवतमाळ )

*भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकाच्या अंकांत पुणें नगर-संशोधन †वृत्ताच्या २० व्या पानावर 'दहा तोंडांची देवी' असा एक लेख आहे. त्यांत पुणें येथें स्वाराच्या गेटाजवळ पंचमुखी मारुतीच्या मागें एक लहानसें देऊळ आहे. त्यांत एक अष्टभुजा देवी व दुसरी अठरा हातांची व दहा तोंडांची, अशा दोन मूर्ति असल्याचा उल्लेख आहे " ही एकवीरा अथवा हिंगलाज देवी असावी " असा तर्क केला आहे. " सर्व हातांत आयुधें असून त्रिशुलाला राक्षस लटकावला आहे...तोंडें उजव्या बाजूस पांच, डाव्या बाजूस चार व मध्यें एक अशीं आहेत " याशिवाय " भद्रकाली ही अठरा हातांची असते म्हणून नृसिंहप्रासाद ग्रंथांत वर्णन आहे. पण त्या ठिकाणीं ती आलीढासनांत किंवा सिंहरथांत बसलेली असें वर्णन आहे. पण ही देवी उभी असून दहा तोंडांची आहे. " असेंहि म्हटलें आहे.

वरील लेख वाचल्यानंतर चांदा ( मध्यप्रांत ) येथें एका उंच माळावर असलेल्या प्रचंड शिलामूर्तींची ( monolith ) आठवण झाली. चांदा येथें बाबू पेठेच्या दक्षिणेस लाल पेठेच्या हद्दींत हा माळवरड आहे. तेथें मोठमोठ्या अखंड शिला असून त्यावर भव्य मूर्ति खोदलेल्या पडल्या आहेत. या मूर्तींचा उल्लेख ग्याझिटिअरमध्यें असून त्या हल्लीं पुराणसंशोधन खात्यानें आपल्या संरक्षणाखालीं घेतल्या आहेत. त्या मूर्तींचा काल निश्चित नसून कोणी कोमटी सावकारानें घडविल्या अशी दंतकथा आहे. या मूर्ति गणेश, मत्स्य, कच्छ, वाराह, शिव इत्यादिकांच्या असून त्यांतच दोन देवींच्या मूर्ति आहेत. ह्या मूर्ति माळावरच अर्धा भाग जमिनींत असलेल्या मोठ्या दगडावर कोरलेल्या आहेत. एका दगडावर अष्टभुजा देवीची मूर्ति आहे व दुसऱ्या दगडावर अष्टादशभुजा, दशमुखा महिषासुरमर्दिनीची मूर्ति आहे. दोन्ही मूर्ति जमिनीशीं सपाट निजलेल्या स्थितींत आहेत. अष्टादशभुजा देवी असलेला दगड सरासरी दहा फूट लांब व सहा फूट रुंद आहे. डोकें दक्षिणेकडे असून पाय उत्तरेकडे आहेत. हें मूर्तीवर्णन वरील पुणें नगर संशोधनवृत्तांत दिलेल्या वर्णनाशीं तंतोतंत जुळतें. पायाशीं महिषासुर पसरलेला असून डावीकडे महिषाचें शीर तुटून पडलें असून धडांतून राक्षस निघाला असून त्यावर त्रिशूळ रोविलेला आहे. डाव्या भुजांपैकीं एका हातांत राक्षसाचें शीर आहे.

अष्टभुजा देवी ही शुंभनिशुंभादि राक्षसांचा संहार करणारी अष्टभुजा नारायणी होय आणि प्रसिद्ध महिषासुरमर्दिनी देवीची कथा आणि वर्णन आपणांस देवी भाग-

---

* पा. स. ५।६५. † पुणें नगर सं. खं. १

वत या प्रसिद्ध पुराणांत वाचावयास मिळतें. ज्ञानकोशांत महिषासुर या नांवापुढें, ' हा रंभना दानवास महिषीपासून झालेला पुत्र होय. यानें हेमगिरीवर वायुभक्षण करून तप केलें. तेव्हां ' पुरुष व्यक्तीपासून तुला मृत्यु येणार नाहीं. ' असा ब्रह्मदेवानें वर दिला. पुढें 'त्याला अष्टादशभुजा देवीनें मारलें अशी कथा देवी भागवतांत आहे.' अशी माहिती दिली आहे.

आज ज्या देवादिकांच्या मूर्ति आपणांस पूर्वकाळीं घडविलेल्या दृष्टीस पडतात त्या, पुराणादि ग्रंथांत दिलेल्या वर्णनानुरूप दिसतात. व त्यांचें स्वतंत्र मूर्तिशास्त्र बनलेलें आहे. आज तें शास्त्र जनसमाजांत प्रसृत नसल्यामुळें कोणत्या देवतेची मूर्ति यासंबंधीं ओळख सुद्धां राहिली नाहीं. या कारणामुळें भलत्याच देवतेची मूर्ति म्हणून लोकांत रूढ होते व असले चुकीचे प्रकार सर्वत्र दिसून येतात.

उदाहरणार्थ, भांदक ( चांदा जिल्हा ) येथें तांडवनृत्य करीत असलेली शिवाची रुंडमालाधारी मूर्ति राक्षसाची मानण्यांत येते. तेथेंच बौद्धांच्या लेण्यांत असलेल्या बुद्ध-मूर्ति ( भिवसेनाच्या ) भीमसेनाच्या समजून, त्या टेकडीस भिवसेनाची टेकडी म्हणून समजतात. कळंच ( जि. मनमाड ) येथें १०।१२ वर्षांपूर्वी सांपडलेल्या अक्षमाला-कमंडलुधारी पार्वतीच्या मूर्तीस अनुसूयेची मूर्ति समजून तिचें पूजन करण्यांत येतें. बार्शी टाकळी येथील प्राचीन मंदिर विष्णुगृह होय असें तेथेंच सभामंडपाच्या भिंतीवर कोरलेला प्राचीन लेख सांगत असून, तेथें विष्णूच्या ऐवजीं सिंहासनावर देवीची मूर्ति मांडून तिची पूजा करतात व ते देवीचें मंदिर म्हणून हल्लीं प्रसिद्ध आहे. वरंगळ ( निजामस्टेट तेलंगण ) येथील पद्माक्षी देवीच्या मंदिरानें तर लोकभ्रमाचा कळसच केला आहे. ही देवी हनमकोंडा येथें एका टेकडीवर गुहेंत आहे; तिच्या पूजेकरतां एका ब्राह्मणास सरकारांतून इनाम आहे. त्याचप्रमाणें अश्विनमासीं नवरात्रांत तेथें मोठा उत्सव होत असून यात्राही भरते. मला कांहीं वर्षांपूर्वी ह्या देवीच्या दर्शनाचा योग आला तेव्हां पाहिलें, तर काय ? ही वैदिक धर्मीयांची देवता मुळींच नसून तें स्थान जैनधर्मीयांचें आहे. ज्या मूर्तीचें पूजन पद्माक्षी देवी म्हणून करतात ती मुळीं देवीची मूर्तीच नव्हे. पाठीमागें खडकावर पार्श्वनाथाची नग्नमूर्ति उभी खोदली असून त्या मूर्तीच्या पायाजवळ उजव्या बाजूस पुरुषाची मूर्ति व डाव्या बाजूस स्त्रि–मूर्ति हातांत उपायन घेऊन बसलेली कोरली आहे. या मूर्ति बहुधा गुहेंत पार्श्वनाथाची मूर्ति खोदविणाऱ्या भक्त–भक्तिनीच्या असाव्या. ही गुहा जैनांची आहे असें मानावयास आणखीही नग्न तीर्थंकरांच्या मूर्ति त्या गुहेंत आहेत; इतकेंच नव्हे तर गुहेबाहेर पहाडा-च्या भिंतीवरही पार्श्वनाथांच्या अनेक नग्नमूर्ति खोदविलेल्या आहेत व शिवाय या गुहेबाहेर एक चौकोनी स्तंभ उभा असून वर पार्श्वनाथांच्या मूर्ति व सुमारें १२ व्या शतकांतील तेलगु लिपींत लिहिलेला शिलालेखही आहे. याप्रमाणें वैदिक धर्मीयांच्या मूर्तीसंबंधानें वैदिकधर्मानुयायी जनतेंत बरेंच अज्ञान आहे. निरनिराळ्या स्थळीं अस-

लेल्या मूर्तीसंबंधानें अभ्यास करून त्यांच्यासंबंधीं ज्ञानाचा प्रसार जनतेस होणें अवश्य आहे.

---

# ९ विदर्भांत सांपडलेल्या भूमिगत मूर्ति

( श्री. **य. खु. देशपांडे,** यवतमाळ )

*या चारपांच वर्षांत वऱ्हाडांत अनेक ठिकाणीं खणतांना जमिनींत मूर्ति सांपडल्या. त्यामुळें या विषयाकडे लक्ष वेधलें. माना ( जी. आय. पी. रेल्वे ) येथें एका मुसलमानास शेतांत खणतांना रामाची मूर्ति सांपडली. ती उत्कृष्ट असून रामाचें गंध आणि सीतेचें कुंकू अंगचेंच आहे. बार्शी–टाकळी येथें जैनांच्या अनेक मूर्ति एकत्र अशा जमिनींत मिळाल्या. पार्श्वनाथाचें शिरपूर येथें गांवाबाहेर प्राचीन मंदिर आहे तेथेंहि आवारांत एकत्रित अशा जैन मूर्ति जमिनींत सांपडल्या. तळेगांव दशासर येथें शेतांत केशवाची मूर्ति गांवाबाहेर शेतांत खणतांना आढळली. मेहेकर येथें पुन्हां एक बालाजीची मूर्ति भूमिगत आढळली. मांगला–देवी येथें एका मंदिराजवळ विष्णूची मूर्ति निघाली. वणी येथें मारुतीच्या मंदिराजवळ पाया खोदीत असतां विष्णु, चतुर्भुज वराहावतार आणि नंदी अशा मूर्ति सांपडल्या. नंदीच्या मूर्तीचा विशेष हा आहे कीं, समोर एक गण उभा असून नंदीस कांहीं चारतो आणि एक गण डाव्या बाजूला उभा असून नंदीवरील झुलीचीं बंधनें बांधीत आहे. यानंतर नुकतेच दोन महिन्यांपूर्वी प्रसिद्ध अशा माहूर क्षेत्रांत एका मुसलमानास आवारांत खणीत असतां पांच जैन मूर्ति मिळाल्या. ४-५ हात खोल खणल्यावर भुसभुशीत अशी राख लागली. त्या राखेंत व्यवस्थितपणें ठेवलेल्या या मूर्ति आढळून आल्या. भूमिगत करतांना मूर्तीची पूजा केली त्या वेळचें गंधहि मूर्तीवर कायम होतें. या मूर्तींपैकीं एक पद्मावती देवीची मूर्ति असून ती पांच फूट उंच आहे. दुसरी एक पार्श्वनाथाची बैठी मूर्ति असून ती दीड फूट उंच आहे. दोन्ही मूर्ति काळ्या पाषाणाच्या गुळगुळीत असून कलेचे उत्कृष्ट नमुने आहेत. या दोन्ही मूर्तींच्या पिठावर उत्कीर्ण लेख आहेत. बाकीच्या तीन मूर्ति पार्श्वनाथाच्या असून दोन बैठ्या व एक उभी आहे. या मूर्ति सरासरी एक–दीड फूट उंचीच्या आहेत. पार्श्वनाथाच्या मूर्तीखालीं " लाल राउत बिकल राउत बिजसीह राउत लाकि राउत । लि " अशीं अक्षरें आहेत. आणि पद्मावती देवीच्या आसनावर खालील लेख आहे.

---

* श. १८६० वार्षिक समारंभ.

९॥ स्वस्तिश्री संवत ११९८ श्रीवीतरागाश्रित रावदेव्या देवांगना क्षोणिपती विभत्तां । प्रतिष्ठितिं मंगलसद्मधीरौ सौधर्मसोपानमिवोन्नमन्तौ ॥ मंगल महाश्रीः ॥

माहूर येथें आज जैनांची वस्ती मुळींच नाहीं, जैन मंदिराचे अवशेषही पण दिसून येत नाहींत. पोलीस स्टेशनच्या आवारांत भग्न जैन मूर्तींचे अवशेष बरेच दिवसांपासून ठेवलेले आढळून येतात. हल्लीं सांपडलेल्या मूर्तींवरून तेथें पूर्वी जैनमंदिर आणि जैन वस्तीही पण असल्याचें अनुमान काढणें बरोबर होईल. श्रीरेणुकेच्या भोप्यांपैकीं एक घराणें जैनांचें होतें असें तेथील भोपी सांगतात. हल्लीं विद्यमान असलेल्या भोप्यांपैकीं एक घराणें मराठ्यांचें असून त्या घराण्याचें आडनांव राऊत असेंच आहे. पण तें घराणें जैनधर्मी नाहीं. पद्मावतीच्या मूर्तीवरील लेखांत संवत ११९८ दिला आहे म्हणजे मूर्ती–प्रतिष्ठापनेला आज सरासरी ८०० वर्षें झालीं असल्याचें दिसून येतें. छोट्या मूर्तीवरील लेखांची आणि मोठ्या मूर्तीवरील लेखांची अक्षर वटिका सारखीच असल्यामुळें व मूर्तीचा दगड आणि मूर्तीची घडण व कौशल्य सारखेंच असल्यामुळें या दोन्ही मूर्ती एकाच काळच्या असल्याबद्दलचें अनुमान फारसें चुकीचें होणार नाहीं. प्रतिष्ठा करणाऱ्या राणीचें नांव देवांगना दिलें असून राजाचें नांव मुळींच आलें नाहीं. देवीचेंही नांव नसून रावदेवी असें म्हटलें आहे. लेखावरून स्थापना करणाऱ्या राजाचा अथवा राजवंशाचा कांहींच बोध होत नाहीं. प्रस्तुत देवीची मूर्ती जैनांच्या पद्मावती देवीची आहे असें म्हणण्यास मुख्य प्रमाण म्हणजे देवीच्या मुकुटावरील जागेवर तीन जैन गणांच्या उभ्या नग्न मूर्ति आहेत आणि त्या त्रिमूर्तीच्या उजवे डावे बाजूस पार्श्वनाथाच्या आसनस्थ मूर्ती आहेत. तथापि देवीची मूर्ती चतुर्भुज वस्त्रालंकार-युक्त असून मूर्तीचें ध्यान जवळजवळ सरस्वतीच्या ध्यानासारखें आहे. म्हणजे खालच्या डाव्या हातांत पोथी, वरच्या डाव्या हातांत वीणा, खालच्या उजव्या हातांत माला आणि वरच्या उजव्या हातांत पाश आहे व मूर्तीच्या पायाजवळ डाव्या बाजूस तोंडांत मोत्यांची माळ असलेला हंसपक्षी आहे. यावरून सरस्वतीचेंच ध्यान पद्मावतीकरितां जैनांनीं उचललें असावें असें वाटतें.

या चार पांच वर्षांत मूर्ति सांपडल्या त्याच्या पूर्वींहि अशाच भूमिगत मूर्ति सांपडल्या. त्यांपैकीं प्रमुख मूर्तीची नोंद करणें अस्थानीं होणार नाहीं.

वाशिम येथें असलेली प्रसिद्ध बालाजीची मूर्ति सुमारें १५०–१७५ वर्षांपूर्वी सांपडली. त्या वेळचा निजामचा अधिकारी नबाब हश्मतजंग याच्या खटपटीनें ह्या मूर्तीची स्थापना करण्यांत आली व त्याच्याच खटपटीनें निजामाकडून ७८ गांवें मूर्तीच्या पूजाअर्चा–उत्सवादिकाकरितां जहागीर मिळाली. त्या मूर्तीचें हल्लींचें जें विस्तीर्ण दगडी मंदिर व प्राकार आहेत तें वाशीमजवळील खडी–धामणीचा कुलकर्णी, नागपूरकर भोसल्यांचा दिवाण आणि ओरिसा प्रांताचा भोसल्यातर्फेचा सुभेदार, प्रसिद्ध भवानी काळु यानें बंगाल सर केल्यानंतर मिळविलेल्या

संपत्तीनें बांधलें आहे. हल्लीं मंदिराची आणि जहागिरींची व्यवस्था भवानी काळु यांच्या वंशजाकडेच आहे.

सुमारें १२५ वर्षांपूर्वी राळेगांव जि. यवतमाळ येथें जुन्या गढींत एका कासाराला रामाच्या मूर्ति सांपडल्या. त्यांपैकीं दोन मूर्तींच्या आसनावर लेख आहेत. त्या मूर्तीहि बऱ्याच प्राचीन असाव्या. लेख अद्याप वाचला गेला नाहीं.

मेहकर येथें प्रसिद्ध असलेली भव्य बालाजीची मूर्ति सुमारें ५० वर्षांपूर्वी तेथेंच गढीमध्यें तांब्याच्या पत्र्यांत सुरक्षित ठेवलेली अशी आढळली. हल्लीं तेथें भव्य देऊळ बांधलें आहे. मूर्ति सांपडण्यापूर्वी या पडक्या गढीकडे शारंगधर देवाला नैवेद्य दाखविण्याची मेहकर येथें असलेल्या जुन्या घराण्यांतून प्रथा होती. याशिवाय सहाशें वर्षांपूर्वीच्या महानुभावाच्या चक्रपाणी–चरित्रांत आणि लीळाचरित्रांत मेहकर येथील शारंगधरासंबंधीं लीला आल्या आहेत. यावरून हल्लींची बालाजीची मूर्ति तीच प्राचीन शारंगधराची मूर्ति असावी असें मानण्याकडे मनाचा कल होतो.

याशिवाय विशेष उल्लेख करण्यासारखी मूर्ति म्हणजे चाळीस वर्षांपूर्वी सावळापूर ( जि. उमरावती ) येथें माळ्याच्या बळदांत सांपडलेली नारायणाची मूर्ति होय. हीहि मूर्ति बालाजीच्या अथवा विष्णूच्या मूर्तीसारखी काळ्या गुळगुळीत पाषाणाची असून तितकीच कलायुक्त आहे.

सुमारें १५ वर्षांपूर्वी कळंब ( जि. यवतमाळ ) येथें श्रीचिंतामणीच्या देवळाजवळ बखळ जागेंत एक पार्वतीची दीडफूट उंचीची सुंदर मूर्ति सांपडली.

याप्रमाणें अनेक ठिकाणीं अनेक लहान मूर्ति सांपडल्या आहेत. नेर परसोपंत जि. यवतमाळ येथें पंचवीस वर्षांपूर्वी गढीची माती खणीत असतां सबंधच्या सबंध हेमाडपंती शिवमंदिर सांपडलें.

वरील सर्व मूर्ति, प्रतिमाशास्त्रांत त्या त्या मूर्तीचें वर्णन आलें आहे त्या वर्णनाबरहुकूम असून तत्कालीं मूर्तीकला किती उन्नतावस्थेंत गेली होती याची जाणीव होते. जैनांच्या मूर्तीवर बहुधा प्रतिष्ठा करणाराचें नांव आणि स्थापनेचा संवत असतो, तसें वैदिक धर्माच्या मूर्तीवर मुळींच नसतें म्हटलें असतां चालेल. विदर्भांत बुद्ध धर्माच्या मूर्ति भांदक, पिंजर, वेरूळ इत्यादि थोडक्याच ठिकाणीं पण त्याही लेण्यांतून आढळून येतात. स्वतंत्र अशीं बौद्ध मंदिरें अथवा बुद्ध मूर्ति आढळून येत नाहींत. जैनांच्या आणि वैदिक धर्माच्या अखंड मूर्ति; आणि मूर्तीचे भग्नावशेष सर्वत्र इतस्ततः पडलेले आढळून येतात.

त्या मूर्ति भग्न केव्हां झाल्या आणि आपापल्या देवांच्या मूर्ति सुरक्षितपणें भूमिगत करण्याची आवश्यकता केव्हां वाटली असावी याचें उत्तर, या भागांत मुसलमानांचें आक्रमण होऊन मूर्ति विध्वंसनाचें कार्य त्यांनीं हातीं घेतलें तेव्हांपासून, असें एकच उत्तर उपलब्ध इतिहासावरून दिसून येतें.

बाहमनी बादशहांच्या कांहीं राजवटींत हिंदूंच्या देवळांचा विध्वंस, मूर्तींचा नाश, जबरीचें धर्मांतर, एवढेंच नव्हे तर हिंदूंची कत्तल झाली होती, याची, इतिहास साक्ष देत आहे. औरंगजेबाचे कारकीर्दींत तर मूर्तिभंजनाकरितां एक स्वतंत्र खातेंच निर्माण करण्यांत आलें होतें. तेव्हां असा अत्याचार होत असतां आपल्या इष्ट देवतांच्या मूर्तींचें रक्षण करणें हिंदूंना अथवा जैनांना क्रमप्राप्तच होतें असें म्हणावयास हरकत नाहीं.

जैनांच्या ज्या मूर्ति उपलब्ध आहेत त्यांत मेहकर येथील बालाजीच्या देवळांत असलेल्या नेमिनाथाच्या भग्न मूर्तीच्या आसनावरील लेखांत विक्रम संवत् १२ व्या शतकांतील वर्ष आहे. त्याचप्रमाणें माहूर येथील नव्या सांपडलेल्या मूर्तीच्या लेखाचेंही तेंच शतक आहे. कारंजा (जि. अकोला) येथील काष्ठा संघाच्या मंदिरांत असलेल्या तळघरांतील चोवीस तीर्थंकरांच्या मूर्तीचे लेख विक्रम संवत् १३ व्या शतकांतील आहेत. या भागांत उपलब्ध असलेल्या जैन मूर्तींवर यापूर्वीचा लेख असलेला अद्याप आढळांत आला नाहीं. कलेच्या दृष्टीनें या मूर्ति त्या कालांतील उत्कृष्ट नमुने म्हणतां येतील.

वैदिक धर्मांतील मूर्तींसंबंधानें मूर्तींवर लेख नसल्यामुळें कालनिश्चिती नक्की करतां येत नाहीं. याच कारणामुळें वर दिलेल्या उपलब्ध मूर्तींचा नक्की काळ देणें अशक्य आहे. फार झालें तर जेथें मूर्ति सांपडल्या तेथील स्थळाच्या उपलब्ध माहितीवरून अथवा मूर्तींसंबंधानें अन्यत्र असलेल्या नोंदीवरून आणि शेवटीं मूर्तीशास्त्राप्रमाणें मूर्तीच्या कलाकौशल्याच्या परिस्थितीवरून अनुमानानें कालनिश्चिती करतां येईल. येवढें मात्र म्हणतां येईल कीं, ज्यावेळीं ह्या मूर्ति तयार केल्या त्यावेळीं मूर्तीकला परिणतावस्थेंत पोहोंचली होती. इतिशम्

---

# १० श्रीशिवाजी चित्र-चर्चा



(श्री. दि. वि. काळे, एम्. ए.)

## प्रचलित किंवा उपलब्ध प्रतिमा (चित्रें)

×१ राजा रविवर्मा निर्मित–घोडेस्वार
२ ब्रिटिश म्यूझिअमचें, १७०७, डच
३ ऑर्म फ्रॅगमेन्ट्समधील, १७८२ (नकल)

* २२ वें संमेलन

४ मीरमहंमदचें, १६८८ पूर्वीचें ( मनुची )
५ व्हॅलेंटाइनचें वेंद्रेप्रकाशित चित्र (१७१२)
×६ रविवर्मा–रॉलिंसनमुद्रित
×७ जयपूर पोथीखान्यांतील
८ प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझिअमचें
×९ खानबहादूर पदमजी प्रकाशित चित्र
×१० मालवणची प्रतिमा

**१ सुप्रसिद्ध चित्रकार राजा रविवर्मा यानें काढलेलें घोड्यावरील चित्रः**— राजा रविवर्मा ( १८४८–१९०६ ) यांनीं काढलेलें चित्र इ. स. १९०६ पूर्वी केव्हां तरी तयार झालें असलें पाहिजे. आणि बडोदा नरेशांना आपली चित्रकला मान्य झाल्यावर, १८९० नंतर राजाजींनीं मुंबईस शिळाछापखाना चालू केला, त्या सुमारास महाराष्ट्रांत त्यांचा रहिवास होता; त्या काळांतील हें चित्र असल्याचा बळकट संशय येतो. श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि ह्यांच्या माहितीप्रमाणें हें चित्र पुण्यांतच, महाराष्ट्रीय रीतिरिवाज, शिवाजीबद्दलचीं वर्णनें, एकदोन प्रसिद्ध चित्रें व कांहीं हिंदुस्थानांतील वगैरे पाहाण्यांत आलेलीं मूळ चित्रें यांचा परिपाक होऊन राजा रविवर्मा यांच्या कुशल कलमांतून निघालेलें आहे. राजा रविवर्मा विलायतेंत गेले असल्यास त्यांनीं ब्रि. म्यू. मधील चित्र पाहिलें असण्याचा बराच संभव आहे. अर्थातच हें चित्र बनावट आहे. परंतु तो बनाव करतांना चित्रकारानें वस्तुनिदर्शनाचे सर्व दंडक पाळून चित्र स्वाभाविक व मनोवेधक करण्याचा प्रयत्न केलेला असून तो बराच साधला आहे असें त्या चित्राच्या लोकप्रियतेवरून म्हणतां येतें.

या चित्राचें सहज विस्मरण होण्यासारखें नसल्यामुळें त्याचें सविस्तर वर्णन शब्दांत करणेचें कारण नाहीं. तथापि १८९३–९५ मध्यें हें चित्र पुण्यांत बऱ्याच जणांनीं पाहिल्याची आठवण असेलच. रचलेलीं व बनवलेलीं चित्रें या मालिकेंत आणखीहि कित्येक सांगतां येतील. परंतु विशेष कसोशीनें व अभ्यासपूर्वक झालेला प्रयत्न म्हणून रा. **करमरकर यांचा शिवाजीनगरमधील नवा पुतळा** याचा अवश्य उल्लेख केला पाहिजे.

**१ ब्रिटिश म्यूझिअममधील** इ. स. १७०७ पूर्वी कोणा डच माणसानें संग्रहित केलेलें चित्र. यावर डच लिपीमध्यें ‘ Shivaji the late Maratha Prince ’ अशा अर्थाचें लिहिलेलें आहे. हिंदी पुरुषांची चित्रमाला असलेलें हें पुस्तक औरंगजेब मरण्यापूर्वी हिंदुस्थानांत तयार झालें असावें. कारण त्यांत औरंगजेबाच्या चित्राखालीं ‘ The present Great Mughal ’ असें लिहिलें आहे. मि. आयर्व्हिन सारख्यांच्या मतें हा चित्रसंग्रह विश्वसनीय समजण्यास हरकत

नाहीं. आपल्याला पाहावयास मिळतात तीं सर्व या मुळांत रंगविलेल्या चित्रावरून तयार झालेलीं एका रंगांतील रेखाचित्रें होत. मूळ चित्रांत कसे रंग आहेत याचें वर्णन आयर्व्हिननें केलें आहे. तें येथें उद्धृत करून त्याबरहुकूम रा. रा. द. गोडबोले, चित्रकार यांच्या साह्यानें बनविलेलें रंगीत चित्र येथें प्रेक्षकांच्या सोईकरितां मांडलें आहे. रंगवर्णन असें—पाऊण पुरुष चित्रांत उजवीकडे तोंड करून उभा आहे. ऑर्मचे फ्रॅगमेंट्स या पुस्तकांतल्याप्रमाणेंच याहि चित्रांत चेहरा आहे ( मतभेदासाठीं पुढें पहा ). काळी दाढी व मिशा, कानावर लांब झुलपें, सोनेरी पगडी, हिरेखचित शिरपेंच, काळा तुरा, पांढरा 'जेगा', पांढरा व वर फुलें असलेला अंगरखा, खांद्या-वरून जांभळा रेशमी शेला, जरीचें काम केलेला कमरबंद, डाव्या बाजूला खोंचलेला खंजीर, उजवा हात पट्ट्याच्या मुठींत लपलेला, व डाव्या हातांत उभी टेकलेली धूप नांवाची लांब तलवार.'

या वर्णनांत चेहऱ्याचें म्हणजे शरीरवर्णाचें वगैरे वर्णन असतें तर बरें झालें असतें.

माझ्या मतें प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझिअमचें जें रंगीत चित्र आपल्यासमोर आहे त्यांतील बराचसा तपशील या चित्राशीं जमणारा आहे. थोडा फार फरक—शेल्याच्या रंगांतील—ह्या दृष्टीनें विशेष विचारांत घेण्यासारखा नाहीं. त्या कालाच्या चित्रकलेबद्दल-च या बाबतींत सामान्य अशीं कांहीं विधानें करतांना या मुद्याचा थोडा अधिक विचार करावयाचा आहे.

**३ ऑर्मनें आपल्या फ्रॅगमेंट्स नामक पुस्तकांत** १७८२ मध्यें ( स्टील एन्ग्रेव्हिंग् ) छापलेलें चित्र. हें मूळ ऑर्मनें छापलें तें साधेंच काळ्या रंगांत छापलें. त्याचें मूळ कोणतें होतें हें त्यानेंहि आपल्या पुस्तकांत दिलेलें नाहीं. यामुळें तर्काला जागा राहिली. सर यदुनाथ सरकार यांनीं नेहमींप्रमाणेंच आपले डोळे न वापरतां आयर्व्हिंगच्या डोळ्यांनीं ह्या व मागील चित्रांतील चेहरा वगैरे एकच आहे असें गृहीत धरलें व 'really the British Museum portrait retouched by an English artist' असें विधान ठोकून दिलें. कोणींहि अल्प काळपर्यंत हीं दोन चित्रें ताडून पाहिलीं असतां दोहोंतील ठळक फरक दिसून येतील. मिशांची ठेवण, शिरपेंच, तुरा, शेला, अंगरखा, मोत्यांचा कंठा, छातीवरील कंठमणी इत्यादि सर्व मागच्या चित्रापासून भिन्न असून तीं दुसऱ्याच एका चित्राशीं जमतीं आहेत हें आतां लगेच आपल्या नजरेस पडणार आहे. सर सरकार यांच्या ह्या भोंगळ विधानाचा सहजच कोणीं इन्कार करील.

**४ मीरमहंमद** यानें इ. स. १६८८ पूर्वीं काढलेलें चित्र.

इटालिअन प्रवासी मनुची यानें लिहिलेला Storia do Mogor हा ग्रंथ

मि. आयर्व्हिन यांनीं संपादित केला आहे. या मनुचीनें इ. स. १७०६ मध्यें व्हेनिसच्या सेनेटला हिंदुस्थानांतील ५६ चित्रांचें एक पुस्तक अर्पण केलें. हीं सर्व चित्रें मनुचीच्या विनंतीवरून मीर महंमद नांवाच्या हिंदी चित्रकारानें काढून तयार केलीं. मीर महंमद हा शहाअलमच्या पदरचा चित्रकार होता. अर्थात् हीं चित्रें मनुचीच्या मुक्कामाचा विचार करतां इ. स. १६८८ पूर्वी काढलेलीं असावीं. हा चित्रसंग्रह आतां पॅरिस येथें आहे. त्यांतील शिवाजीच्या घोड्यावरील चित्राच्या प्रतिकृति आतां अनेक छापल्या आहेत. लॅगल या गृहस्थानें 'प्राचीन व अर्वाचीन स्मारकें' म्हणून १८२१ मध्यें लिहिलेल्या ग्रंथांत व 'हिंदुस्थान'वरील De Jacigny and Raymond या ग्रंथकर्त्यांच्या ग्रंथांत (१८४५) हें चित्र वूडकट करून छापविलें आहे. हे दोन्ही ग्रंथ पॅरिसमध्यें छापले. तेव्हां त्यांनीं तेथील चित्रांचा लाभ घेतला हें इष्टच झालें. या चित्रांत शिरपेंच, जेगा आदिकरून बहुतेक गोष्टी यथास्थित असून घोडा व परिवारहि आहे. याच्या रंगांबद्दल वर्णन आज उपलब्ध नाहीं. डॉ. बाळकृष्णांनीं आपल्या आल्बममध्यें मनुचीचें हें चित्र स्टोरियावरून व शिवाय De Jacigny वरून असें निरनिराळें छापविलें आहे. उभय चित्रें हीं एकच मुळावरून काढविलेलीं आहेत. एवढेंच नव्हे तर मनुचीच्या चित्रांतील थोडा तपशील कमी करून दुसरें चित्र बनलें आहे हें थोड्याशा निरीक्षणानंतर सहजच लक्षांत येण्यासारखें आहे.

**५ व्हॅलेंटाईनचें चित्र** (रा. बेंद्रे यांनीं स्वतंत्र तसबीर रूपानें छापविलेलें), १७१२. या चित्राचे ठसे अनेक प्रकारांनीं छापलेले आहेत. परंतु या सर्वांत रा. बेंद्रे यांनीं छापविलेलें मुळाबरहुकूम आहे. व्हॅलेंटाइन यानें प्रथम हें चित्र आपल्या पुस्तकांत १७२६ चे सुमारास छापलें. त्यानंतर बर्निअरच्या प्रवासवृत्तांत त्याची प्रतिकृति आली. व्हॅलेंटाइननें आपला ग्रंथ (Oud-en Nieuw Oost Indien) १७२५ त छापला. त्यापूर्वीचें हें चित्र असलें पाहिजे. डच ईस्ट इंडिया कंपनीच्या मार्फतहि हें मिळालें असेल. रा. बेंद्रे यांना या चित्राची हस्तलिखित प्रत मॅकेंझी कलेक्शनमध्यें मिळाली. ती या १७२६ तील चित्राची असूं शकेल. या चित्रावरील नांव डचमध्येंच आहे व चित्राचें कलम व चित्रांतील ठेवण पाश्चात्य डच वळणाची आहे, असें कोणी म्हणणें सत्यास सोडून होणार नाहीं. आतां व्हॅलेन्टाईन हा इ. १६६४ पासून १६९० पर्यंत हिंदुस्थानांत येता जात असा होता. ह्यावरून हें चित्र त्यानें ह्या मुदतींत आपल्या माहितीच्या डच चित्रकाराकडून काढवून घेतलें होतें असें म्हणावयास अर्थात् जागा आहे.

रा. बेंद्रे यांनीं छापलेलें चित्र शक्य तितकें मुळाबरहुकूम छापविण्याची काळजी घेतली आहे. इतर चित्रांच्याहि इतक्या कसोशीनें घेतलेल्या नकला मिळाल्यास अर्थात् यावर अधिक प्रकाश पडूं शकेल.

या व इतर चित्रांत एक विशेष फरक आहे, तिकडेहि कित्येक निरीक्षकांनीं लक्ष वेधिलेलें आहे. इतर बहुतेक चित्रांत केवळ जेगा नसून शिरपेंच व तुरा हें राजचिन्ह स्पष्टपणें काढलेलें आहे. या चित्रांत फक्त जेगा एवढेंच ऐश्वर्यचिन्ह आहे. त्या अर्थीं राज्याभिषेकाच्या पूर्वीचें हें चित्र आहे, असें कित्येक म्हणतात. आणि वरील विशेष फरकामुळें ह्या चित्राचें वैशिष्ट्य व अस्सलत्वहि दृढ होतें असा त्यांचा रोख दिसतो.

ऑर्मनें १७८२ च्या आपल्या आवृत्तींत छापलेलें चित्र हें या चित्रावरून थोड्याफार फरकानें तयार झालें आहे, हें कोणासहि पटेल. सर यदुनाथ सरकार यांनींहि खासगी पत्रांत तशी–आपल्या पूर्वींच्या म्हणण्याविरुद्ध–स्पष्ट कबुली दिली आहे.

**६ रविवर्म्याचें मि. रॉलिंसनच्या** Shivaji the Maratha या पुस्तकांत आरंभीं छापलेलें चित्र.

कोठलाहि आधार दर्शविल्याशिवाय छापण्याचें धाडस रॉलिंसन यांनीं केलेलें दिसतें. एरवीं राजा रविवर्म्याचें म्हणून प्रसिद्ध असलेलें एक सर्वज्ञात चित्र असतांना ह्या चित्रावर विश्वास कोण ठेवील ?

**७ जयपूर पोथीखान्यांतील चित्र**—हें. डॉ. बाळकृष्ण यांनीं आपल्या चित्रसंग्रहांत छापलेलें चित्र कलेच्या दृष्टीनेंहि प्रेक्षणीय नाहीं. ऐतिहासिक दृष्ट्या तर तें खरोखरच उपेक्षणीय आहे.

**८ प्रिन्स ऑफ् वेल्स् म्यूझिअममधील चित्र**—हें चित्र आपल्या-इकडील म्हणून व पुरुषोत्तम विश्राम मावजी यांच्या स्मृतीमुळें बरेंच विश्वसनीय असें मानलें जाण्याची प्रथा शिवभारतकारांनीं पाडली. व ती इतरांनीं पुढें चालविली आहे. भा. इ. सं. मंडळानेंहि त्याची सवर्ण प्रतिकृति आपल्या सभामंदिरांत स्थापून त्या मानण्याला थोडें वजन प्राप्त करून दिलें आहे. परंतु ह्याहि बाबतींत इतर चित्रांप्रमाणेंच निश्चय करण्यास बराच अवधि आहे.

**९ खानबहादूर बी. डी. पदमजी यांजवळील चित्र**—ह्या चित्राचा वृत्तपत्रांतून वाजवीपेक्षां अधिक गाजावाजा झाला. तथापि घोडे आदिकरून सर्वच विपर्यस्त आणि विषमकालीन आहेत, असें म्हणण्यास विशेष भीति नको.

**१० मालवणची प्रतिमा-मूर्ती**—ह्या मूर्तीबद्दल गंभीरपणें कोणींच कोणतें विधान अस्तिपक्षीं करण्याचा आग्रह धरल्याचें स्मरणांत नाहीं. तेव्हां या प्रतिमेचा उल्लेखच पुरे.

## महाराजांबद्दल वर्णनें

प्रत्यक्ष रेखाचित्रांशिवाय शब्द-चित्रेंहि उपलब्ध झालेलीं आहेत. त्यांपैकीं

परिचित व समक्ष पद्धतीचीं वाटतात तेवढींच एकत्र केलीं तरी त्यांवरून महाराजांच्याबद्दल कांहीं कल्पना बांधतां येण्यासारखी आहे.

( १ ) शिवभारत अ. २९ श्लो. १५-२५ उंबरखिंडींत मोंगलांचा संदेश आल्यावेळच्या वर्णनांतील तपशील—

( १ ) अतिसुंदर
( २ ) अंगांत अभेद्य कवच
( ३ ) मस्तकावर शिरस्त्राण
( ४ ) वैकक्ष हारासारखा व प्रचंड ढालीनें शोभणारा दुपेटा.
( ५ ) सोनेरी कमरपट्ट्यापासून लटकणारी तरवार
( ६ ) तेजस्वी उजव्या हातांत उंच भाला
( ७ ) अत्यंत सौम्य परंतु तेजानें उग्र.
( ८ ) उंच मानेचा, रुंद छातीचा, सुलक्षणी, धिप्पाड शरीराचा, दोन्ही बाजूला पंखांप्रमाणें बाणांचे भाते असलेला, रत्नजडित अलंकार घातलेला घोडा.

( २ ) 'English Records on Shivaji'—पत्र ७९, पृ. ७३, एस्कालियटचें पत्र, दि. २८ जाने. १६६४.

'His person described by those who have seen him is as follows :—

He is of a *mean stature*, erect and of an excellent proportion. He is active in exercise; and whenever he speaks he seems to smile. He has a *quick and piercing eye.* He is *whiter than* any of his people.

( ३ ) ग्रँट् डफ्-४ थी आवृत्ति, खंड १, पृ. २५२.

From what can be learned of Shivaji in domestic life, his manners were remarkably *pleasing*, and his address *winning*; he was apparently *frank* but seldom *familiar;* passionate in his disposition, but kind to his dependents and relations.

He was a man of *small stature*, and of an active rather than strong make; his countenance was handsome and intelligent; he had very *long arms* in proportion to his size, which is reckoned a beauty among the Mahrattas.

पृ. २५२ वरील टीप—

In the Alinama, Nusserut satirizes the *big feet and long arms* of the Mahrattas. There is no likeness of Sivajee

preserved either at Kolhapur or Satara; and none of the Europeans who saw him have recorded any description of his person.

His body was burned at Raygad where there was a tomb erected on the collected ashes.

(४) Thevenot, a Frenchman (travelled in the Deccan from Nov. 1665 to Feb. 1667 )— "The Rajah is *small* and *tawny*, with quick eyes which indicate abundance of spirit. "

## सामान्य वर्गीकरण

वरील माहितीवरून एकंदर वर्गीकरण असें करतां येईल.

१ अगदीं बनावट व अलीकडचीं चित्रें

( १ ) रविवर्म्याचीं २

( २ ) पद्‌मजी

( ३ ) मालवणची मूर्ति

( ४ ) जयपूर पोथीखाना

२ नकला–मूळ चित्रावरून घेतलेलीं

( १ ) ऑर्म-फ्रॅगमेंट्स् मधील

३ साधारणपणें मूळ म्हणून समजतां येण्यासारखीं

(रंगीत) १ ब्रिटिश म्यूझिअममधील

(रंगीत) २ मीर महमद् घोड्यावरील (मनुची)

(साधें) ३ व्हॅलेंटाईचें बेंद्रे–प्रकाशित

(रंगीत) ४ प्रिन्स ऑफ् वेल्स म्यूझिअमचें.

जर उपलब्ध चित्रांचा इतिहास व अस्सलबरहुकूम रंगीत प्रती मिळत्या तर कोणतीच अडचण नसती. परंतु प्रत्येक चित्राचा जन्मकाल उपलब्ध नसून फार तर प्रसिद्धिकाल ( छापण्याचा व माहिती लागण्याचा ) तेवढाच सांपडत असल्यामुळें यांमध्यें आपसांतले अनुक्रम लावणें कठीण झालें आहे. तथापि या प्रत्येक चित्रांत असें कांहीं भिन्नत्व आहे कीं त्या योगानें हीं चित्रें परस्परांच्या सरळ नकला नव्हेत एवढें विधान निर्धास्तपणें करतां येईल.

साधारणपणें बाह्य पोशाकांत असावें तसें साम्य आहेच. त्यांवरून अर्थात् कांहींच निष्कर्ष निघण्यासारखा नाहीं.

या चार चित्रांपैकीं तीन आपल्या म्हणजे पौर्वात्य पद्धतीचीं आहेत. एकच पाश्चात्य पद्धतीचें आहे. कलमभेद म्हणजे साम्यभेद असाहि कित्येक कलावंत पर्याय

मानतात. परंतु त्यावरून वस्तुस्थितिनिदर्शनाचा फरक काय पडेल तेवढा, बारकाईनें लक्षांत घेण्यासाठीं मूळांचाच अभ्यास झाला पाहिजे.

तो अभ्यास नकला उपलब्ध होईपर्यंत करणें कठीणच आहे.

## चित्र-स्वीकार व चित्र-रचना

अशा परिस्थितींत शिवाजीसारख्या महापुरुषाचें चित्र प्रत्यहीं जरूर लागत असतांना त्याबद्दलचा विचार काय करावा, हा एक मोठा व महत्त्वाचा प्रश्न आहे. वरवर पहाणारास हा प्रश्न हास्यास्पद वाटेल. चित्रें उपलब्ध आहेत तेवढीं पाहून त्यांतील अधिक जुनें व समकालीन व प्रत्यक्ष माहितीनें काढलेलें असेल असें ठरेल तें ग्राह्य ठरवावें व त्याचा प्रचार सर्वत्र करावा असें कोणी म्हणतील. ऐतिहासिक माहिती व चित्रलेखनाचा संपूर्ण इतिहास उपलब्ध होतांच हा प्रश्न तडक निकालांत लागला असें मानण्याकडे बहुजनांची सहज प्रवृत्ति होईल.

परंतु या बाबतींत इतरहि पुष्कळ गोष्टी विचारांत घेण्यासारख्या आहेत. पूर्वींच्या चित्रकलेंत कांहीं दोष आहेत. त्यामुळें आजच्या चिकित्सक बुद्धीला पटेल असें चित्र असावें, असाहि कित्येक जण आग्रह धरतील. ( १ ) शिवाजीचें म्हणून स्वतंत्र वैशिष्ट्य दिसण्याइतकीं जुनीं चित्रें खुलासेदार नाहींत. ठराविक चेहरा व आकृतिच दिसते; ( २ ) पोटाचा घेर, उंची वगैरे शिवाजीसारख्या बहुधावर्णित वीराला शोभेशी नाहीं; ( ३ ) शरीररंगासारख्या सामान्य गोष्टीबद्दलहि मतभेद आहेत. तेव्हां उघडपणेंच विसंवादी दिसणारीं चित्रें—रामदासांसारख्यांचीं—प्रचलित करवावीं का काय? हा वादग्रस्त प्रश्न आहे.

त्यावर विरोधक असेहि भेटतील कीं जे नवींच चित्रें बनवून प्रसिद्ध करवावीं असें म्हणतील. नवीं चित्रें बनवून तीं ऐतिहासिक कशीं म्हणावीं ? असा एक आक्षेप निघेल. पण त्याला उत्तर खालीलप्रमाणें देतां येईल.

आपण इतिहास तयार करीत असतांना कांहीं बनाव—सरमिसळ—ग्राह्याग्राह्यता धरून जशी करतों, तशी चित्रकलेची प्रगति लक्षांत घेतां स्वभाववर्णन, चरित्र आणि वास्तविक मनुष्याचें दर्शन यांचा उत्कृष्ट मेळ घालण्याचा प्रयत्न कोणा चित्रकारानें करून पाहिल्यास तो प्रयत्न एकंदरींत उपकारकच होणार आहे. असें निदान मला वाटतें. इतिहासांत सर्वच गोष्टी अगदीं मुळांत सांपडतील तशा आपण मानीत नाहीं. कारण आपल्या बुद्धीनेंहि कांहीं मजल मारली आहे, असें आम्हीं समजतों. चित्रकलेच्या दृष्टीनेंहि आपला डोळा तयार झाला असेल अशा माणसांनीं हा प्रयत्न ( चित्ररचना ) करून पाहिला तर प्रगति इष्ट दिशेनें होईल.

---

# ११ रामटेक येथील चित्र

(प्रा. द. वा. पोतदार, बी. ए.)

रामटेक येथें देवळाच्या गढींत शिरतांच डाव्या हातास एक छोटें देऊळ बाबा कंगालदास यांच्या देवळाचे अलीकडे लागतें. त्या देवळांत दोन पुरुषमूर्ती ( वसिष्ठ व दशरथ ? ) दिसल्या त्यांचे मागें एक काचेचें मखर आहे. त्याहाळून पाहिल्यावर ध्यानीं आलें कीं या मखरांत बसविलेलीं बहुतेक चित्रें ऐतिहासिक आहेत. चित्रें मध्यम प्रतीचीं आहेत. रंगीत आहेत. त्यांत श्रीमंत सवाईमाधवराव पेशवे, नाना फडणीस व थोरले पाटिलबोवा यांचीं चित्रें चटकन् ओळखूं येतात. यांचे पोषाख विशेषतः शिरस्त्राणें, जरा हिंदुस्थानी वळणावर चितारलीं आहेत. इतर चित्रांत दोन तीन तरी नागपूर भोसल्यांपैकीं आहेत. एक शेवटच्या आप्पासाहेब भोसल्यांचें असावें असें वाटतें. यावरून चित्रांचें मखर त्यावेळचें दिसतें. शिवाय एक नबाब व एक बेगम अशी जोडी आहे तें उमगलें नाहीं. कांहीं काचा फुटल्याहि आहेत. या मखराच्या संरक्षणाची व्यवस्था लावणें अवश्य आहे. त्यावरील चित्रांच्या छबी उतरूनहि घेतल्या पाहिजेत. या कामाकडे नागपूर वाङ्मयेतिहास संशोधक मंडळ लक्ष पुरवील अशी मला आशा आहे.

---

# १२ मोर दीक्षित यांच्या संग्रहांतील दोन तसबिरा

(श्री. चिं. ग. कर्वे, बी. ए.)

या दोन कांचेवर काढलेल्या तसबिरा मोर दीक्षितांचे विद्यमान वंशज श्री. अनंत माधव दीक्षित यांनीं मंडळास नजर केल्या आहेत. त्याबद्दल मी मंडळातर्फे त्यांचे आभार मानतों.

या तसबिरा मोर दीक्षितांनीं उत्तर हिंदुस्थानांतून आणल्या व आणखीहि अशाच तसबिरा दीक्षितांच्या संग्रहीं होत्या. या तसबिरांतील व्यक्ति ओळखून काढावयास पाहिजेत.

---

## ३ ग्रंथविषयक

# १३ शिवभारत व श्रीपरशुराम



( श्री. रा. दा. देसाई, बी. ए. )

श्रीशिवाजी महाराजांनीं चिपळुणास जाऊन श्रीपरशुरामाचें दर्शन घेतल्याचा उल्लेख शिवभारताच्या २९ व्या अध्यायांत आहे. ते श्लोक असेः—

अथ दाल्भ्यपुरे राजा यथार्हमधिकारिणम् ।
निधाय सज्जं युद्धाय वीरं च द्विसहस्रिणम् ॥ ७३ ॥
व्रजन्नभयदानेन प्रीणयन्नभयार्थिनः ।
अपश्यच्चित्रपुलिनं पुरं त्रिचतुरैर्दिनैः ॥ ७४ ॥
स तत्र वरदं विश्वविश्रुतं चिरजीविनम् ।
रैणुकेयं वर्णनीयचरितं निरवर्णयत् ॥ ७५ ॥
अथासौ कालकामाभ्यां भ्रातृभ्यां परिवारितम् ।
भक्तिमान् भृशमर्हाभिर्भार्गवं समभावयत् ॥ ७६ ॥
अद्धा परशुरामोऽपि ध्वस्ताविद्धाधिपौजसे ।
पृथुं प्रसादमकरोदमुष्मै पृथिवीभृते ॥ ७७ ॥
स तत्र भार्गवक्षेत्रे दानशौंडो दयान्वितः ।
क्षिप्रदत्तेन वित्तेन विप्रवृन्दमनन्दयत् ॥ ७८ ॥

" भग दाभोळामध्यें योग्य अधिकारी नेमून आणि युद्धास सज्ज असा दोन हजारी सरदार ठेवून पुढें चालला असतां वाटेंत अभय मागणाऱ्यांस अभयदानानें संतुष्ट करीत करीत शिवाजी राजा तीन चार दिवसांनीं चिपळुणास आला. तेथें त्यानें वरदाता, जगद्विख्यात, चिरंजीव, व वर्णनीय चरित्र ज्याचें त्या परशुरामाचें डोळे भरून दर्शन घेतलें. नंतर ज्याच्या दोन्ही कडेस काल व काम हे भ्राते आहेत अशा परशुरामाची भक्तिमान् शिवाजीनें पूजा करून त्यास अत्यंत संतुष्ट केलें. परशुरामानें सुद्धां अविंध राजांची रग जिरविणाऱ्या त्या राजावर मोठा प्रसाद केला. त्या दानशूर व दयाळू शिवाजीनें त्या परशुरामक्षेत्रांतील ब्रह्मवृन्दास तत्काळ धन देऊन आनंदित केलें."

शिवभारतांतील ह्या व इतर अनेक ऐतिहासिक उल्लेखांचा पडताळा त्या त्या ठिकाणीं जाऊन माहिती मिळवून पाहावा असें पुष्कळ दिवस मनांत होतें. त्याप्रमाणें गेल्या नोव्हेंबरांत (१९२७) चिपळुणास जाऊन तेथून दोन मैलांवर असलेला लहानसा डोंगर चढून परशुरामाचें दर्शन घेतलें. आणि लगेच देवस्थानाच्या व्यवस्थापकांस व

इतरहि गृहस्थांस " येथें शिवाजी महाराज कधीं श्रीपरशुरामाच्या दर्शनास आले होते काय ? " असें विचारलें. पण कोणासहि त्याविषयीं माहिती नव्हती. नंतर कोणाजवळ ऐतिहासिक कागदपत्र आहेत काय म्हणून चौकशी केली. तेव्हां श्रीपरशुराम संस्थानचे पंच श्री. गणेश विनायक जोशी यांजपाशीं एक जुना कागद असल्याचें समजलें. त्यांनीं तो कृपा करून मजला दाखविला व तो वाचण्याच्या कामींहि साह्य केलें. तो वाचीत असतां पुढील वाक्य आढळलें:—

" श्रीभार्गवरामाचे दर्शनास शिवाजीमहाराज आले ते समयीं गोविंद जोशी बिन अनंत जोशी परशुरामकर यांनीं पूजा सांगोन तीर्थोपाध्येपण देऊन दर सालिना पाऊणशें होन करून दिले. " याशिवाय त्या प्रांतांतील राजकीय गोष्टींसंबंधीं व इतरहि सामान्य ऐतिहासिक माहिती त्या कागदांत बरीच सापडते. परशुराम क्षेत्रासंबंधीं तर पुष्कळच माहिती त्यांत दिलेली आहे.

पण मला तेथें राहण्यास फारच थोडी सवड असल्यानें सर्व ऐतिहासिक माहितीचें टांचण करून घेतां आलें नाहीं. तथापि वरील वाक्य हें शिवभारतांतील उल्लेखास स्वतंत्र पुरावा मिळाल्यानें शिवभारताच्या प्रामाण्यास विशेष बळकटी येत आहे. शिवाजी महाराजांनीं परशुरामाचें दर्शन घेतल्याचा उल्लेख या दोन स्थलांशिवाय इतरत्र नाहीं असें समजतें. तेव्हां परमानंदानें जेवढी ऐतिहासिक माहिती दिली आहे ती प्रमाणभूत आहे असें म्हणण्यास या प्रत्यंतर प्रमाणानें शंका वाटत नाहीं.

सध्यां काल–काम–पुरशुरामाच्या उभ्या मूर्ति आहेत. त्या काळ्या पाषाणाच्या आहेत. ह्या मूर्ति शक १७०७ ( सन १७८५ ) मध्यें गुहागरकर परचुऱ्यांनीं बसविल्या. त्यापूर्वीं वज्रलेपाच्या आसनी मूर्ति होत्या. त्या ब्रह्मेंद्रस्वामींनीं स्थापिल्या होत्या. त्याच्याहि आधीं काल–काम–परशुराम त्रिगुणात्मक लिंगें गौप्य राखून होतीं त्यावर भोगमूर्ती वर वज्रलेप करून स्थापिल्या.

शिवभारतांत कालकाम हे परशुरामाचे भ्राते असें वर्णिलेलें आहे. पण महाभारत वनपर्व अध्याय ११६ मध्यें रुमण्वान, सुषेण, वसु व विश्वावसु अशीं वयोनुक्रमानें परशुरामाच्या भावांचीं नांवें दिलेलीं आहेत. परशुराम हा कनिष्ठ बंधु होय. स्कन्द–पुराणान्तर्गत सह्याद्रि खंडांतील रेणुकामाहात्म्यांत वसु, विश्वावसु, बृहत्कण्व, बृहद्भानु आणि परशुराम अशीं नांवें आढळतात. तेव्हां कालकाम हे भ्राते कसे असा प्रश्न उपस्थित होतो. सत्त्वरजस्तमोगुणात्मक उत्पत्तिस्थितिलयकर्ते ब्रह्म–विष्णु–महेश तर हे नसावेत !

मधली परशुरामाची मूर्ति कालकामाच्या मूर्तींहून थोडीशी अधिक उंच आहे. संकल्पामध्यें कालकामपरशुरामेभ्यो नमः असें वाक्य असतें. ' काळा राम गोरा राम काळ काम परशुराम ' असे चरण जुन्या लोकांच्या तोंडीं आढळतात.

---

# १४ श्रीमद्याज्ञवल्क्यगीतोपनिषदः ।
## आणि
# श्रीयाज्ञवल्क्य-सहधर्मिणी

( श्री.-र. कृ. पाटणकर, बंदर राजापूर. )

**याज्ञवल्क्य** या नांवाच्या अनेक व्यक्ति होऊन गेल्या असून त्यांचा उल्लेख श्रुति, स्मृति इतिहास, पुराण इत्यादि ग्रंथांत आढळतो, तथापि याज्ञवल्क्याविषयीं आत्यंतिक निष्ठा बाळगणारे कांहीं अंधभक्त सूक्तासूक्ताचा विचार न करितां पौर्वापर्य-विरोधाची क्षिति न बाळगतां ती व्यक्ति एकच होऊन गेली असें प्रतिपादन करीत असतात, आणि असें करतांना त्यांना अर्थात् जहद्जहल्लक्षणा करावी लागते.*

प्रस्तुत लेखामध्यें याज्ञवल्क्याच्या सर्व चरित्राचा विचार करावयाचा नाहीं. केवळ याज्ञवल्क्याच्या एका अज्ञात ग्रंथाचा आणि त्याच्या सहधर्मिणीचा परिचय करून द्यावयाचा आहे. याज्ञवल्क्यांच्या या अज्ञात ग्रंथाचा उल्लेख याज्ञवल्क्य स्मृतीच्या प्रायश्चित्ताध्यायांत

ज्ञेयं चारण्यकमहं यदादित्यादवाप्तवान् ।
योगशास्त्रं च मत्प्रोक्तं ज्ञेयं योगमभीप्सता ॥ ११० ॥

या श्लोकांत आला आहे. आदित्यापासून प्राप्त झालेलें आरण्यक म्हणजे बृहदारण्यक अर्थात् शतपथ ब्राह्मणाचा अंतिम भाग होय; आणि " योगशास्त्रं च मत्प्रोक्तं " हा ग्रंथ कोणता याविषयीं कांहींच ज्ञान नव्हतें; त्याविषयीं कांहीं तरी तर्कवितर्क आपापल्या बुद्धिबलाप्रमाणें विद्वान् लोक करीत असत. परंतु सुदैवानें अकरा वर्षांपूर्वी राजापूर येथील श्री संस्कृत पुस्तक-संग्रहालयांत या ग्रंथाचा लाभ झाला. हा ग्रंथ येथून दोन कोसांवर असलेल्या विखारें गोठणें या गांवांतील प्रसिद्ध विद्वान् ब्रह्मभूत श्रीयुत वेदशास्त्रसंपन्न गोविंद रामचंद्रशास्त्री शेवडे यांचा ग्रंथसंग्रह त्यांचे चिरंजीव श्री शिवरामभाऊ यांनीं पूर्वोक्त संस्थेला अर्पण

* याज्ञवल्क्याचें चरित्र, श्रीक्षेत्र नासिक येथील श्रीयुत वेदशास्त्रसंपन्न श्रीधरशास्त्री वारे आणि हुबळीचे वकील श्रीयुत रामचंद्र गोविंद कोलंगडे यांनीं विस्तृत लिहिलें असून श्रीयुत वेदशास्त्रसंपन्न धुंडिराज गणेश दीक्षित पांचवडकर आणि श्रीयुत महामहोपाध्याय ( आतां श्री मच्छंकरानंदस्वामी ) श्रीधर त्र्यंबकशास्त्री पाठक यांनीं केलेल्या श्रीशुक्ल यजुर्वेद-वाजसनेयिमाध्यंदिन संहितेच्या मराठी अनुवादाच्या प्रारंभीं संक्षेपानें दिलें आहे.

केला.–या संग्रहांत सहस्रावधि लिखित ग्रंथ आहेत–त्यांत उपलब्ध झाला आणि हा ग्रंथसंग्रह शास्त्रीबुवा ७० वर्षांपूर्वी मुंबईला "लोकहितेच्छु" नांवाचे मराठी इंग्रजी साप्ताहिक काढीत असतां तेथें श्रीक्षेत्र काशीचा ग्रंथसंग्रह विक्रीला आला तो त्यांनीं विकत घेतला आणि हा मूळ काशी येथील सुप्रसिद्ध चेतसिंह महाराज यांचा असावा, असें त्यांतील एका पोथीवर त्यांची स्वाक्षरी आहे त्यावरून दिसतें. अस्तु. हा ग्रंथ म्हणजेच "श्रीयाज्ञवल्क्यगीतोपनिषद्" होय.

"श्रीमद्भगद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ... ... ... नाम ...... अध्यायः।" हा जसा समाप्तिलेख श्रीमद्भगवद्गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या अंतीं असतो त्याप्रमाणें प्रत्येक अध्यायाचे "श्रीमद्याज्ञवल्क्य-गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे ... ... अध्यायः" असें म्हटलें जाहे. अध्यायाचा क्रमांक मात्र आहे. अमुकांचा संवाद किंवा अमुक विषयाचा निर्देश त्यांत केलेला नाहीं. मात्र तसें करतां येण्यासारखें आहे. उपलब्ध प्रतिमेंत पृष्ट ४ ते २० पर्यंत १७ पाठपोठ पृष्ठें आहेत. अध्याय ११ असून ग्रंथ अपूर्ण असला तरी १७ व्या पृष्ठांतील विषयावरून एकादें पृष्ठच लुप्त झालें असावें असें वाटतें. मात्र पहिल्या तीन पाठपोठ पृष्ठांतील ६२ श्लोक अनुपलब्ध आहेत.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प्रथम | अध्याय श्लोक | ७२ | षष्ट | अध्याय श्लोक | ८२ |
| द्वितीय | " | १८ | सप्तम | " | ३७ |
| तृतीय | " | १७॥ | अष्टम | " | ३९ |
| चतुर्थ | " | ७२ | नवम | " | ४५॥ |
| पंचम | " | २१ | दशम | " | २४ |
| षष्ठ | " | ८२ | एकादश | " | २८ |
| | | ४५६ | | | |

एकूण ४५६ श्लोकांचें परिगणन होतें. आणखी फार तर ३१४ श्लोक अवशिष्ट असावेत.

या ग्रंथामध्यें यमाद्यष्टांग योगाचें सांगोपांग विवेचन केलेलें असून प्रथम अध्यायांत प्रास्ताविक आणि यम आणि आनुषंगिक विषयांचें विवेचन असावें असें उपलब्ध ६३ ते ७२ श्लोकांवरून वाटतें.

(१) प्रथमाध्यायांतील उपलब्ध १० श्लोकांमध्यें "नित्यस्वकर्मनिरत ब्रह्मविच्छ्रेष्ठ अशा गुरूची तो संतुष्ट होईल अशा प्रकारें शिष्यानें शुश्रूषा करावी" असें सांगितलें आहे. यापुढें "दया, आर्जव, क्षमा, धृति, मिताहार, शौच (बाह्य, आंतर) गुरुपात्रता" यांच्या व्याख्या दिल्या आहेत.

( २ ) द्वितीयाध्यायांत नियमांचें वर्णन दिलें आहे.

" तपः संतोष आस्तिक्यं दानमीश्वरपूजनम् ॥
सिद्धान्तश्रवणं चैव ह्रीमतिश्च जपो हुतम् ॥ १ ॥ "

असे तप आदि नऊ नियम सांगितले आहेत. श्रीपातंजलयोगसूत्रांत " शौचतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः " ( २।३२ ) असे ४ चारच नियम सांगितले आहेत. श्रीकूर्मपुराणांतील श्रीव्यासगीतेच्या एकादश अध्यायांत

तपः स्वाध्यायसन्तोषः शौचमीश्वरपूजनम् ।
समासान्नियमाः प्रोक्ता योगसिद्धिप्रदायिनः ॥ २० ॥

असें सांगितलें आहे. त्यांतील (बाह्य अंतर) शौचाची व्याख्या प्रथम अध्यायांत ( या याज्ञवल्क्यगीतेंत सांगितली आहे. ) अवशिष्ट तपः, संतोष, आस्तिक्य, ईश्वरपूजन, दान, सिद्धान्तश्रवण, ऱ्हीमति, जप ( वाचिक-मानस) आणि ध्यान आणि हुत यांच्या व्याख्या सांगितल्या आहेत.

( ३ ) तृतीयाध्यायांत आसनें सांगितलीं आहेत. त्यांत स्वस्तिक, गोमुख, पद्म, वीर, सिंह, भद्र, मुक्त, मयूर यांचें परिगणन केलें असून त्यांच्या व्याख्या दिल्या आहेत. आणि प्रत्येक आसनाचीं फलें सांगितलीं आहेत.

( ४ ) चतुर्थाध्यायांत नाडींची उत्पत्ति, त्यांची शुद्धि, त्यांचें कारण; कंद; वायु त्याचे प्रकार, त्यांचीं स्थानें, त्यांचीं कर्मे; जंतुमात्राचें शरीर; शरीरांतील वायु व अग्नि योगाभ्यासानें सम अथवा न्यून करून ब्रह्मविच्छ्रेष्ठ पूज्य होणें, शरीरांतील अग्नीचें स्थान ( मनुष्य, चतुष्पाद; तिर्यग्योनि, पक्षि यांचें पृथक् पृथक् ) कंदस्थान; नाभि-नाभिचक्र. त्याचे आधारें देहप्रतिष्ठा, नाभिचक्रावर जीव रममाण होणें, त्याच्या अधोभागीं प्राणाचा संचार, प्राणारूढ जीवाच्या ऊर्ध्वभागीं कुंडलीस्थान,

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ २२ ॥"

[ ह्या श्लोक श्रीमद्भगवद्गीतेंत सप्तमाध्यायांत चतुर्थ आहे. त्यांतील मे याचा अर्थ तेथें 'मी जो श्रीकृष्ण त्या माझी' असा आहे. येथें याज्ञवल्क्याचे उत्तरांत तो आल्यामुळें 'मी जो याज्ञवल्क्य त्या माझी' असा अर्थ शक्य नाहीं. कारण तेथें श्रीकृष्णांनीं आपण परब्रह्म, परमात्मा असें सांगितल्याप्रमाणें त्यांना तसें म्हणणें युक्त आहे, पण याज्ञवल्क्यांनीं तसें कोठें सांगितलें नाहीं. अर्थात् ह्या श्लोक याज्ञवल्क्यांनीं भगवद्गीतेंतूनच उध्दृत केला असावा असें स्पष्ट दिसतें. तथापि त्यांनीं येथें तसेंहि स्पष्ट रीतीनें लिहिलें नाहीं. ] अष्टप्रकृतिरूपा अष्टकुंडली, तिचें नागरूपा असें स्वरूप, सुषुम्ना नाडी, मुख्य चतुर्दश नाडीः-

" नाडीनामपि सर्वासां मुख्यास्त्वेताश्चतुर्दश ॥ २७ ॥

इडा च पिङ्गला चैव सुषुम्ना च सरस्वती ॥

धारणा चैव पूषा च हस्तिजिह्वा यशस्विनी ॥ २८ ॥

अलंबुषा च गांधारी मुख्याश्चैताश्चतुर्दश ॥

यांमध्यें प्रथम तीन मुख्यतरा आणि त्यांतहि मुख्यतमा मुक्तिमार्गा अशी सुषुम्ना, या चतुर्दश नाडींचीं स्थानें, मुख्यतर तीन नाडींत राहणारे सूर्यचंद्र–त्यांचीं स्थानें-त्यांचें स्वरूपः—

इडायां पिङ्गलायां च चरतश्चन्द्रभास्करौ ॥ ३४ ॥

इडया चन्द्रमा ज्ञेयः पिंगलायां रविः स्मृतः ॥

चंद्रस्तामस इत्युक्तः सूर्यो राजस उच्यते ॥ ३५ ॥

विषभागो रवेर्भागः सोमभागोऽमृतः स्थितः ॥

तावेव धत्तः सकलं कालं च त्रिदिवात्मकम् ॥ ३६ ॥

भोक्त्री सुषुम्ना कालस्य गुह्यमेतदुदाहृतम् ॥

या सर्व नाडींमध्यें

प्राणोऽपानःसमानश्च उदानो व्यान एव च ॥

नागः कूर्मः कृकरसो देवदत्तो धनंजयः ॥ ५० ॥ (श्च रुकरो)

एते नाडीषु सर्वासु चरन्ति दश वायवः ॥

या प्राणादि दश वायूंचा संचार, त्या वायूंचीं स्थानें,

भुक्तं सर्वरसं गात्रे व्यापयन् वह्निना सह ॥

द्विसप्ततिसहस्रेषु नाडीमार्गेषु संचरेत् ॥ ५७ ॥

शरीरस्थ अग्नीशीं या वायूंचे योग, त्यांचीं फलें, इत्यादि विषय सांगितले आहेत.

(५) पंचमाध्यायांत नाडीशुद्धिसंपादन करण्याला साधनें कोणतीं आहेत आणि नाडीशुद्धिप्राप्ति झाली असल्याचें लक्षण काय हें सांगितलें आहे. त्यांत जिज्ञासु शिष्य विधिविहित कर्म आचरण करणारा, कामसंकल्प वर्जन करणारा, इ- इ. असा असावा. अशा शिष्यानें ब्रह्मघोषसमन्वित, स्वधर्मनिरत शांत ब्रह्मवेत्ते ज्यामध्यें आहेत अशा फलमूलोदकानीं युक्त सर्वकामफलप्रद तपोवनांत अथवा देवालयांत किंवा नगरांत अथवा ग्रामांत सुरक्षित असा सुंदर मठ बांधून त्यांत कांहीं मुनींचे मतें वातातपविवर्जित, निर्जन अशा गृहांतच योगसंपादनेच्छूनें वास करावा. आणि विध्युक्त कर्माचरण करून मंत्रांनीं शरीरन्यास करून, मृदु आसनावर किंवा अजिनावर बसून

समग्रीवशिरःकायः संवृतास्यः सुनिश्चलः ॥

नासाग्रे शि···भृद्विं················ ॥ १४ ॥

नासाग्रे सोमसंयुक्तं जोत्स्नाजालवितन्वितं ।
सप्तमस्य तु वर्गस्य चतुर्थं बिंदुसंयुतम् ॥ १५ ॥
बिंदुमध्यं समालोक्य नेत्राभ्यां मनसा सह ॥
...... ममृतं पश्येन्नेत्राभ्यां सुसमाहितः ॥ १६ ॥ इ. इ.

असें सांगितलें आहे.

( ६ ) षष्ठाध्यायांत प्राणायामाचें सविस्तर वर्णन आलें आहे. प्राणायाम कसा करावा, प्राणायामाचें वेळीं कोणीं कोणता किती जप करावा; विप्रानें लौकिक मंत्र-जप करावा का करूं नये, त्यानें वैदिक मंत्रजप करावा; जप करणारांचें आचरण कसें असावें.

ब्राम्हणः श्रुतिसंपन्नः स्वधर्मनिरतः सदा ।
स वैदिकं जपेन्मंत्रं लौकिकं न कदाचन ॥ १५ ॥
केचिद्भूतहितार्थाय मंत्रमिच्छंति लौकिकम् ॥
द्विजवत्क्षत्रियस्योक्तः प्राणसंयमने जपः ॥ १६ ॥
वैश्यानां धर्मयुक्तानां स्त्रीशद्राणां तपस्विनाम् ॥
प्राणसंयमने गार्गि मन्त्रं प्रणववर्जितम् ॥ २० ॥
नमोऽन्तं शिवमंत्रं वा वैष्णवं चेष्यते बुधैः ।
यद्वा समभ्यसेच्छूद्रो लौकिकं विधिपूर्वकम् ॥ १८ ॥
प्राणसंयमने स्त्री वा जपेत्तद्विंशतिद्वयं ॥
न वैदिकं जपेच्छूद्रः स्त्रियश्च न कदाचन ॥ १९ ॥
स्वाश्रमस्थस्य वैश्यस्य केचिदिच्छंति वैदिकम्

इत्यादि वर्णिलें आहे. पुढें प्राणायाम कोणीं किती करावे आणि त्यांचीं फलें कोणतीं तेंहि सांगून पुढें प्राणायामाचा नाना प्रकारच्या आधिव्याधींचा नाश करण्यास कसा समर्थ होतो हें सविस्तर वर्णिलेलें अभ्यसनीय आहे.

( ७ ) सप्तमाध्यायांत प्रत्याहार, त्याची व्याख्या, तो कसा करावा, त्याचें फल काय हें सविस्तर वर्णिलें आहे.

( ८ ) अष्टमाध्यायांत धारणा, तिची व्याख्या, तिचें साधन, तिचें फळ इत्यादि सविस्तर वर्णिलें आहे.

( ९ ) नवमाध्यायांत ध्यानाची व्याख्या, त्याची पूर्वपीठिका–श्रीविष्णूनें ब्रह्मदेवाला निवेदिलें–, ध्यानाचे सगुण निर्गुण असे प्रकार, त्यांचें सविस्तर वर्णन, वासुदेव, नारायण–सूर्य इत्यादिकांचीं ध्यानें, ( भागवत, नारायण उपनिषद यांत अशीं ध्यानें आहेत. ) आत्मध्यान, जीवन्मुक्त इत्यादि विषय वर्णिले आहेत.

( १० ) दशमाध्यायांत " समाधि " योग सांगितला आहे.

समाधिः समतावस्था जीवात्मपरमात्मनोः ॥
ब्रह्मण्यवस्थितिर्याऽसौ समाधिः प्रत्यगात्मनः ॥ २ ॥

अशा समाधीच्या व्याख्या दिल्या आहेत. यापुढें भगवद्गीतेंतील अभ्यासयोगाप्रमाणें उत्कृष्ट वर्णन आलें आहे. " सर्व द्वाराणि संयम्य" " मूर्ध्न्याध्यात्मनः प्राणं० भ्रुवोर्मध्ये " " ॐ मित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन् सुसमाहितः " " यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरं। तं तमेव व्रजेद्भावं इति योगविदो विदुः " इत्यादि विषय वर्णिले आहेत.

( ११ ) एकादशाध्यायांत शरीरांतील अग्नि आणि वायु यांच्या अनेक प्रकारच्या योगानें अनेक प्रकारचीं फलें कशीं प्राप्त होतात, त्याकरितां साधनें कशीं उपयोगांत आणावीं, किती काल अभ्यास करावा, कोणत्या सिद्धीकरितां किती काल अभ्यास करावा लागतो, इत्यादिकांचें सांगोपांग सुंदर विवेचन केलें आहे. त्यांतील अंत्यभाग जिज्ञासूंकरितां पुढें देत आहें.—

मनोलयं यदा याति भ्रूमध्ये योगिनां नृणाम् ॥
जिह्वामूलेऽमृतस्त्रावो भ्रूमध्ये चात्मदर्शनम् ॥ २० ॥
दिवोद्यानानि रम्याणि नक्षत्राणि गृहाणि च ( ग्रहास्तथा ? )
ऋषयः सिद्धगंधर्वाः प्रकाशं यांति योगिनाम् ॥ २१ ॥
भ्रुवोंऽतरे विष्णुपदे निविष्टे मनोलये यावदियात्प्रमुग्धे ॥
तावत्समभ्यस्य पुनः खमध्ये देहं सदा संस्मर पूर्वरूपम् ॥ २२ ॥
समीरणे विष्णुपदे निविष्टे जीवे च तस्मिन्नमृते सुसंस्थे ॥
तस्मिंस्ततो याति मनोलयं चेन्मुखे समीपं तादिति ब्रुवन्ति ॥ ३३ ॥
समीरणे विष्णुपदे निविष्टे विशुद्धशुद्धौ च तथा स्म नष्टे ॥
आनन्दमत्यद्भुतमेति सत्यं त्वं गार्गि पश्याद्य विशुद्धबुद्ध्या ॥ २४ ॥
एवं समभ्यस्य च दीर्घकालं यमादिभिर्युक्ततनुर्मिताशी ॥
आत्मानमासाद्य गुहां प्रविष्टं मुक्तिं व्रज ब्रह्मपुरे पुनस्त्वम् ॥ २५ ॥
भूतानि *यस्मात् प्रभवन्ति सर्वे येनैव जीवंति चराचराणि ॥
जातानि यस्मिन् विलयं प्रयान्ति तद्ब्रम्ह्म विद्धीति वदंति सर्वे ॥ २६ ॥
हृत्पंकजव्योम्नि यदेकरूपं व्यक्तं सदानन्दमयं सुसूक्ष्मम् ॥
तद्ब्रह्म निर्भासमयं गुहायामिति श्रुतिश्चापि समामनंति ॥ २७ ॥
अणोरणीयान्महतो महीयानात्मा गुहायां निहितोऽस्य जंतोः ॥
तमक्रतुं पश्य विशु ... ... ... ... ... ...

* ( सर्वाणि भवंति यस्मात् असा दुसरा पाठ. )

इतकाच ग्रंथ उपलब्ध झाला आहे आणि तेवढ्यावरूनच ग्रंथाचा अवशेष फारसा नसावा असें अनुमान केलें तर तें अयुक्त होईल असें वाटत नाहीं.

या गीतेंत आपणाला नारायण–त्रिशिखि ब्राह्मण–योगतत्व इत्यादि उपनिषद् भगवद्गीता, यांतील विषयच नव्हे तर वचनेंहि आढळतात. भगवद्गीतेनंतर याची रचना झाल्याचें आम्हीं पूर्वींच दाखविलें आहे.

हा ग्रंथ गार्गी–याज्ञवल्क्य–संवादरूप आहे. ही गार्गी कोण हें पुढें सांगणार आहों. अध्यायवार सामान्यतः जें विषयनिरूपण केलें आहे त्यावरून ग्रंथाचें स्वरूप कळून येईलच. या ग्रंथांत योगाविषयीं अनेकांचीं साधकबाधक मतें, त्यांचें खंडन–मंडन सोपपत्तिक प्रतिपादिलें आहे. यांत भिषग्वर अश्विनीकुमार आणि अगस्त्यमुनि यांचा प्रत्यक्ष उल्लेख केला असून याव्यतिरिक्त शास्त्रतात्पर्यवेदी तांत्रिक–योगशास्त्रज्ञ–विद्वान्–सुशिक्षित योगी ब्रह्मविदूर, वैदिक, वेदविद्, ध्यानयोगविद्, इत्यादि विशेषणांनीं निर्देश केला आहे.

ग्रंथप्रतिमेचे स्वरूपावरून तो चारशें वर्षांपूर्वी लिहिला असावा असें वाटतें. तसेंच अक्षरवटिका काशीक्षेत्राकडील असावी. यांत महाराष्ट्रास अपरिचित पृष्ठमात्रा आहे. इतर वर्ण तादृश अपरिचित नाहींत.

यणेप्रमाणें ग्रंथाचें वर्णन यथामति करून ' श्रीयाज्ञवल्क्य सहधर्मिणी ' विषयीं विवेचन करितों. याज्ञवल्क्यांना मैत्रेयी आणि कात्यायनी अशा दोन स्त्रिया असल्याचें बृहदारण्यकोपनिषद् चतुर्थ अध्यायाच्या पंचम ब्राह्मणामध्यें आहे:–

" अथ ह याज्ञवल्क्यस्य द्वे भार्ये बभूवतुः मैत्रेयीं च कात्यायनी च । तयोर्ह मैत्रेयी ब्रह्मवादिनी बभूव । स्त्रीप्रज्ञैव तर्हि कात्यायनी ॥ " श्रीमत् शंकरानंदाच्या आत्मपुराणाचे सप्तमाध्यायांत याज्ञवल्क्याचें चरित्र सविस्तर दिलें आहे.

" धर्मात्मा याज्ञवल्क्योऽयमासीद्वाजसनेयकः ।
बाल्यादारभ्य तेजस्वी विषयेषु गतस्पृहः ॥ १२ ॥
विकारीव बहिर्भाति चित्रदोषविवर्जितः । ...
स तु संजातविज्ञानः संन्यासाय समुद्यतः ॥
ब्रह्मचर्याश्रमादेव निस्पृहो दारसंग्रहे ॥ ४१ ॥
विरक्तं वीक्ष्य शिष्यं तं भगवान् रविरब्रवीत् ।
याज्ञवल्क्याऽद्य विद्यायाः प्रयच्छ गुरुदक्षिणाम् ॥ ४२ ॥
संप्रदायप्रवृत्त्याख्यां वेदानध्यापयाखिलान् ॥
त्रैवर्णिकान् गृहस्थः सन् पश्चात्संन्यासमाव्रज ॥ ४३ ॥

यावरून विषयांविषयीं निरिच्छ आणि ब्रह्मचर्यापासूनच दारसंग्रहाविषयीं निस्पृह

असा हा याज्ञवल्क्य ज्ञानप्राप्ति झाल्यावर संन्यास ग्रहण करण्याला उद्युक्त झाला असतां त्याचे गुरु भगवान् सूर्यनारायण यांनीं त्याला गृहस्थ आश्रम स्वीकारून त्रैवर्णिकांना सर्व वेदांचें अध्यापन कर अशी गुरुदक्षिणा त्याचेपाशीं मागितली. त्याला अनुसरून त्यान

पितुराज्ञां अलं प्राप्य जनकाच्च धनं बहुस्नातो दारद्वयं चक्रे........॥ ४४ ॥

अशा रीतीनें एकच नव्हे तर त्यानें दोन भार्या केल्या. त्यांना पुत्रपौत्रादि झाले. विद्यार्थ्यांना वेदविद्या पढविली, आणि वृद्धत्व आल्यावर एकदा सहज आत्मगत म्हणतात

" यद्बनेऽप्यहमहो धैर्यं प्राप्य वैराग्यमाश्रितः ॥
निष्ठावन्तसमं पश्यन् देहं तप उपाश्रितः ॥ १०७ ॥

नाकुर्वन् मम धैर्यस्य विलोपं वामलोचनाः ।
स्वर्गादभ्यागताः शश्वद्बहुमन्मथमन्थराः ॥ १०८ ॥

मम धैर्यं हतं न + अद्य वार्धके तद्गतं वृथा ॥

असें स्पष्ट सांगितलें आहे. अशा रीतीनें दोन भार्या तर प्रसिद्धच आहेत. आतां या याज्ञवल्क्यगीतेनें याज्ञवल्क्यांच्या तृतीय सहधर्मिणीचा परिचय करून दिला आहे. ही भार्याहि मैत्रेयीप्रमाणें अधिकारसंपन्न होती. तिला उद्देशून त्यांनीं गार्गी तपोनिधि, वरारोहा, वरानना, द्विजोत्तमा, विद्येंद्रा, सुव्रता, मुनिसत्तमा, तपोधना, ब्रह्मविदांवरा, अनघा, महाभाग्या, तपस्विनी–प्रमुग्धा, प्रिया इत्यादि विशेषणें लाविलीं आहेत. एवढ्यावरूनच ती त्यांची भार्या कशी म्हणतां येईल अशी शंका येण्याचा संभव आहे. त्याकरितां पुढील अवतरण पहा. चतुर्थ अध्यायाच्या प्रारंभींच

श्रुत्वैतद्भाषितं वाक्यं याज्ञवल्क्यस्य धीमतः ।
पुनराह महाभाग्या सभामध्ये तपस्विनी ॥ १ ॥
**गार्ग्युवाच०** भगवन् ब्रूहि मे स्वामिन् नाडीशुद्धिं विधानतः
केनोपायेन शुद्धाः स्युर्नाडयः सर्वं देहिनाम् ॥ २ ॥
उत्पत्तिं चैव नाडीनां कारणं च यथाविधि ॥
कथं च कीदृशं प्रोक्तं कति तिष्ठंति वायवः ॥ ३ ॥
स्थानानि च ( चैव ? ) वायूनां कर्माणि च पृथक् पृथक् ।
विज्ञातव्यानि वाऽन्यस्मिन् देहे देहभृतां वर ॥ ४ ॥
वक्तुमर्हसि तत्सर्वं त्वत्तो वेत्ता न विद्यते ।
इत्युक्तो **भार्यया** तत्र सम्यक् तद्गतमानसः ॥ ५ ॥
गार्गीनां सुसमालोक्य तत्सर्वं समभाषत ।

**याज्ञवल्क्य** उवाच : शरीरं तावदेवं हि षण्णवत्यंगुलात्मकम् ॥
विद्यते सर्वजंतूनां स्वांगुलीभिरिति **प्रिये** ॥ ७ ॥

यांतील 'भार्यया' आणि 'प्रिये' या दोन शब्दांवरून याज्ञवल्क्यांची गार्गी ही तृतीय सहधर्मिणी असल्याचें सिद्ध होत आहे.

बृहदारण्यकोपनिषदाच्या तृतीय अध्यायांतील षष्ठ आणि अष्टम ब्राह्मणांतील गार्गी वाचक्नवी ही जिज्ञासु अधिकारिणी दिसते. आणि ती त्या वेळीं कुमारी, तरुणी, विवाहिता किंवा अविवाहिता यासंबंधीं तेथें कांहींच उल्लेख नाहीं. कुमारी असल्यास याज्ञवल्क्यांचा उपदेश ऐकल्यानंतर तिचा त्यांच्याशीं विवाह झाला असें म्हणण्यालाहि कांहीं आधार नसल्यामुळें त्या गार्गीहून ही याज्ञवल्क्यसहधर्मिणी गार्गी भिन्न होय असें आम्हांला वाटतें.

---

# १५ बिब्लिओथेक रॉयेल द बेल्जिक मधील भारतविषयक ग्रन्थ

( श्री. य. खु. देशपांडे, यवतमाळ )

ब्रुसेल्स (बेल्जम) येथें सप्टेंबर १९३८ मध्यें जी विसावी प्राच्य-विद्या-परिषद भरली होती त्या वेळेला परिषदेच्या सभासदांना लोवेन येथें जी तेराव्या शतकापासून चालत आलेली युरोपांतील सर्वांत प्राचीन अशी क्याथोलिक युनिव्हर्सिटी आहे तिच्या चालकांनीं मुद्दाम निमंत्रण देऊन बोलाविलें होतें. त्यावेळीं परिषदेचे प्रतिनिधी म्हणून ता. ७-९-३८ रोजीं वरील युनिव्हर्सिटीस भेट देण्याचा योग आला होता. त्याचवेळीं युनिव्हर्सिटीच्या अधिकाऱ्यांनीं त्यांच्या व्यवस्थेखालीं असलेलें लोवेन येथील प्रसिद्ध ग्रन्थसंग्रहालयही दाखविलें होतें. या ग्रंथालयांत ३० लाख ग्रन्थ असून आधुनिक कार्डपद्धतीप्रमाणें ग्रंथकार आणि ग्रन्थ यांची योग्य सूचि करण्यांत आली असल्यामुळें कोणताही ग्रन्थ ५ मिनिटांत आपणास पहावयास मिळतो. तेथील लायब्ररीयन यांनीं ती पद्धती प्रतिनिधींना समजावून सांगितली होती.

ज्या दिवशीं वरील ग्रंथालय दाखविण्यांत आलें होतें त्याच दिवशीं ब्रुसेल्स येथें असलेल्या बिब्लिओथेक रायेल द बेल्जिक या सरकारी ग्रंथालयांत असलेल्या प्राच्य-संस्कृतीविषयक ग्रंथांचें एक प्रदर्शन बेल्जम देशाच्या शिक्षण मंत्र्यानीं कलोनियल

---

* २७ वें संमेलन श. १८६२

म्युझिअममध्यें मुद्दाम परिषदेच्या प्रतिनिधींकरितां मांडलें होतें तें दाखविण्यांत आलें होतें. त्याचे प्राच्यदेशानुक्रमानें, सर्व साधारण प्राच्यदेश, आर्मीनिआ, अरेबिआ, इराण, तुर्कस्थान, इजिप्त, हिन्दुस्थान, इ. असे एकुण १२ विभाग केले होते. बाकीच्या विभागांत जर्मन, फ्रेंच, डच व इंग्लिश वगैरे भाषेंत लिहिलेले ग्रन्थ आणि त्या त्या देशांतील भाषेंत लिहिलेले हस्तलिखित ग्रन्थ आहेत.

त्या प्रदर्शनांत हिंदुस्थान–विषयक असे सरासरी ४० ग्रंथ व वस्तु आहेत. त्या प्रसंगीं जी सूचि प्रतिनिधींना देण्यांत आली ती फ्रेंच भाषेंत होती. त्या सूचीबरोबर हिंदुस्थानविषयक वस्तूंची व ग्रन्थांची टाईप केलेली एक यादी होती.* या यादींत सोळाव्या शतकापासून चालू शतकापर्यंतचे ग्रन्थ आढळून येतील. त्याच-प्रमाणें युरोपांतील निरनिराळ्या देशांतील विद्वानांनीं निरनिराळ्या भाषेंत ग्रन्थ लिहिलेले व छापलेले असे दृष्टीस पडतील. या यादींतील कांहीं महत्त्वाच्या ग्रन्थांचा उल्लेख त्यावरील आवश्यक अशा टिपणीसह नमुन्याकरितां म्हणून करीत आहे.

१ वेनीसचा नागरिक मार्को पोलो याचें प्रवासवृत्त. हा ग्रन्थ फ्रेंचमध्यें असून तो १५ व्या शतकांतील आहे.

२ रॉबर्त द नोबिली आणि इतर जेसुईट लोकांची हिंदुस्थानविषयक पत्रें. इ. स. १६०९ ते १६२७ पर्यंतचीं अस्सल पत्रें.

३ गोदीनो द इरेदिआ यानें स. १६१३ मध्यें तिसरा फिलीप राजा याला केलेला रिपोर्ट. ह्यांत मलाकापासून क्याथेपर्यंतच्या हिंदुस्थानच्या भागाचा उल्लेख आहे.

४ भगवद्गीता. संस्कृतचें भाषांतर चार्लस उइल्कीन्स यानें इंग्रजींत केलें आणि त्यावरून पारो यानें फ्रेंच भाषेंत भाषांतर केलें तें इ. स. १७८७ मध्यें प्रसिद्ध झालें.

५ वेद आणि त्यावरील भाष्य–संस्कृत मधून फ्रेंच भाषांतर इ. स. १७७८ लेझूर.

६ जुआं आलबर्त द मंडेल्स्लो, हिंदुस्थानचा प्रवास इ. स. १७२७ अमस्टरडाम.

७ हिंदुस्थानचा ऐतिहासिक व भौगोलिक वृत्तांत पेर जोसेफ द फकेन्थालेर जेसुईट बर्लीन इ. स. १७८६, तीन भाग.

८ पीअर द्यु जारीक. हिंदुस्थानचा इतिहास. पोर्तुगीज लोकांच्या आगमना-पासून क्याथोलिक ख्रिश्चन पंथाचा हिंदुस्थानांत प्रसार झाला त्यासंबंधीं. वोर्दो इ. स. १६०८

९ जान व्हान लिन्शोटेन पोर्चुगल ते हिंदुस्थान प्रवास. आमस्टरडाम इ. स. १५९६ भाग ३.

---

* ही पूर्ण यादी मंडळ संग्रहांत आहे.

१० जोन पेत्रुस् माफीअस–हिंदुस्थानचा इतिहास फ्लारेन्सीए इ. स. १५८८

११ गोव्यांतील इन्क्वीझीशनचा वृत्तान्त–प्यारीस इ. स. १६८६

१२ हिंदुस्थानचे मोगल बादशाह सरकारी डच रिपोर्टांवरून लुगडुनो बटेवोरम इ. स. १६३१

१३ डच लोकांच्या हिंदुस्थानसंबंधीं नौकानयनाचा इतिहास, सी निकोलस – आमस्टरडाम इ. स. १६०९

१४ जुआं ह्युगस् लीन्स्को, हिंदुस्थानच्या प्रवासाची हकीकत मूळ जर्मन भाषेंतून फ्रेंच भाषेंत आमस्टरडाम इ. स. १६२०

१५ ईस्ट इंडिआ कंपनीची स्थापना व वाढ यासंबंधीं झालेल्या प्रवासाचें रेकार्ड इ. रोजर अम्स्टरडाम सन १७०२–१७०६ भाग ५

वरील रेकार्डांत पोर्चुगीज, डच, फ्रेंच इत्यादिकांचा हिंदुस्थानशीं संबंध आला त्यासंबंधानें त्या त्या ग्रंथकारांनीं स्वतः लिहून ठेवलेला तत्कालिन इतिहास आहे. त्या दृष्टीनें या ग्रंथांचें हिंदुस्थानच्या इतिहासाला फार महत्त्व आहे. व तें इतिहासप्रेमी आणि अभ्यासू विद्वानांच्या नजरेस आणलें आहे.

---

## ४ गणित ज्योतिष

# १६ भास्कराचार्यांचीं कोष्टकें

( श्री. द. वि. आपटे )

* भास्कराचार्यकृत लीलावतींत प्रारंभीं कोष्टकें आहेत तीं अशीं:—

| | | | |
|---|---|---|---|
| २० कवड्या | = १ काकिणी | ८ वाल | = १ धरण |
| ४ काकिणी | = १ पण | २ धरण | = १ गद्याणक |
| १६ पण | = १ द्रम्म | १४ वल्ल | = १ घटक |
| १६ द्रम्म | = १ निष्क | ५ गुंजा | = १ मासा |
| २ यव | = १ गुंज | १६ मासे | = १ कर्ष = १ सुवर्ण |
| ३ गुंजा | = १ वाल | ४ कर्ष | = १ पल |

* पा. स. ३।५५

× ज्योतिर्गणितग्रंथांत 'भास्कर' या नांवानें ओळखले जाणारे सध्यां दोन 'भास्कर' ज्ञात आहेत. पहिला भास्कर ( इ. ५२२ ) म्हणजेच 'लघुभास्करीय' व 'महाभास्करीय' या ग्रंथांचा प्रणेता व वृद्धार्यभटाचा

सिमंतकमणी १ भार सुवर्ण प्रसवे. त्याची संख्या–श्लोक—

"भार देतचि सिमंतक सोनें। सांगती वजन ते अनुमानें।
पस्तिसा मणि उणे अकरा हे। शेरमाससह बत्तिस आहे॥"

एकूण वजन १॥४॥८॥३।१ म्ह. दीड खंडी, साडेचार मण, पावणेनव शेर, सव्वातीन तोळे, एक मासा इतके भारास वजन.

*या ठिकाणी ५ गुंजा = १ मासा म्हटलें आहे. परंतु इतर ठिकाणीं निरनिराळें प्रमाण दिलें आहे. याचें कारण गुंज लहान मोठी असते. यामुळें हा विरोध वास्तविक नाहीं, असें बुद्धिविलासिनी टीकेंत गणेश दैवज्ञ म्हणतो. त्याचे शब्द असे आहेत, "अत्र किल पंच गुंजो माष उक्तः। वैद्यकशास्त्रे तु सप्त गुंजः। धर्मशास्त्रे तु सार्ध सप्त गुंजः। एतद् बृहत् मध्य लघु गुंजाभिप्रायेण न विरुध्यते। यथा एकैव पृथ्वी त्रयस्त्रिंशत् शत योजन मित्युक्ता ३३००। शिरोमणो तु सप्तारिनंदाब्धयः ४९६७. अन्यत्र तु द्विद्विशरर्तवः ६५२२। एतद् बृहन्मध्यलघु यवोत्थ योजनाभिप्रायेण न विरुध्यते। तद्वदिदं माषादिकमपि। शेषं कर्षादिकं सर्वत्र सममेव" ८ यव = १अंगुल असें जें वर सांगितलें त्याबद्दल देखील गणेश दैवज्ञानें विकल्प सांगितलेला आहे. "यवोदरैस्तिर्यग्यवैः अष्टभिरंगुलं स्यात् उर्ध्वैस्त्रिभिर्व्रीहिभिर्वा। तथा च स्मृतिः— तिर्यग्यवोदराण्यष्टा ऊर्ध्वा वा व्रीहयस्त्रयः इति।

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८ यवोदर | = | १ अंगुल | २० वंश चौरस | = | १ निवर्तन |
| २४ अंगुल | = | १ हात | १ घनहात | = | १ मागधखारिका |
| ४ हात | = | १ दंड | $\frac{1}{16}$ खारिका | = | १ द्रोण |
| २००० दंड | = | १ कोस | $\frac{1}{4}$ द्रोण | = | १ आढक |
| ४ कोस | = | १ योजन | $\frac{1}{4}$ आढक | = | १ प्रस्थ |
| १० हात | = | १ वंश=काठी | $\frac{1}{4}$ प्रस्थ | = | १ कुटक |

---

(इ. ४९९) साक्षात् शिष्यांपैकीं होता तो. आणि दुसरा भास्कर म्हणजे 'सिद्धान्त-शिरोमणिकार' भास्कर (इ. ११५०) हा होय. यांची कीर्ति तर भरतखंडाबाहेरहि युरोपियन विद्वानांस झालेली आहे. त्यांची माहिती सांगण्याची आवश्यकता नाहीं. पहिल्या भास्कराची मात्र त्रुटितच माहिती आहे. यासंबंधीची माहिती. I.H.Q. Vo 6, 1930 पृ. 727–736 मध्यें पाहावी.

*लीलावतीच्या मराठी टीकाकारानें वजनाच्या कोष्टकांत थोडी भर घातली आहे. ती अशीः—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २० पल | = | १ विशी | १०० तुला | = | १ भार |
| ५ विशी | = | १ तुळा | ५ भार | = | १ महाभार |

| | | |
|---|---|---|
| ¾ गद्याणक | = | १ टंक |
| ७२ टंक | = | १ शेर |
| ४० शेर | = | १ मण |

इसवीसनाच्या सातव्या शतकाच्या मध्यभागीं हुएनत्संग नांवाचा चिनी प्रवासी हिंदुस्थानांत आला होता. तो म्हणतो, "प्राचीन पद्धतीप्रमाणें योजन, ४० ली इतकें आहे. हिंदुस्थानांतील सांप्रतच्या राजव्यवहारांतील योजनांचे ३० ली होतात. परंतु शास्त्राच्या पुस्तकांत लिहिलेलें योजन १६ लींचें आहे" (भारतीय ज्योतिषशास्त्र पृष्ठ ३२०–३२१) यावरून योजनाचें मान एकसारखें नव्हतें हें उघड आहे.

---

# १७ अधिसंवत्सर--निर्णय



(श्री. ब. द. आपटे)

पेशवे दप्तरांत जे कांहीं कागद छापले गेले त्यांत बरेचसे कागद ऐतिहासिक व्यक्तींच्या राजकीय हालचाली दर्शविणारे आहेत हें खरें; तथापि कांहीं त्यांत ज्योतिषविषयक प्रश्नास चालना देणारे आहेत. त्यांकडे मी वाचकांचें लक्ष मुख्यतः वेधीत आहे.

माधवरावांच्या कारकीर्दीत नाना फडणीसानें ज्योतिषी बोलाऊन अधिसंवत्सरांसंबंधीं निर्णय करविला. तें पत्र पे. द. पृ. ७४९४ भा. ४३ ले. ८०. त्यांतील आशय असा—

"शके १६९३ फाल्गुन मासीं गुरु कुंभ राशीगत होतो. परंतु शके १६९५ मध्यें गुरूचा राशीभेद होत नाहीं त्यास त्या वर्षास नांव काय द्यावे ?"

तेव्हां अशा प्रसंगीं या संवत्सरास अधिसंवत्सर असें नांव द्यावे कीं काय असा प्रश्न निघाला असतां नाना फडणीसानें ज्योतिषी बोलाऊन त्यांच्याकडून निर्णय करविला. तो असा—

"सारांश, अर्थ पहातां, या वर्षाचें नांव लुप्तसंवत्सर नव्हे, अधिवत्सर *आर्य-

---

* सौर, आर्य व ब्राह्म सिद्धान्त हे तीनहि सिद्धांत भरतखंडांत कमीअधिक मानानें प्रचलित आहेत. परंतु त्यांची व्याप्ति कोठें कोठें असावी हा प्रश्न उत्पन्न होतो. त्याचें निरसन खालील श्लोकानें होते. तो श्लोक असा—

गोदावरीविंध्यनगातराले श्रीब्रह्मपक्षाद्गणितं विधेयम् ।
गोदावरीदक्षिण आर्यपक्षाद्विंध्याचलादुत्तरतो हि सौरः ॥

पा. स. २१६४ B. I. Q. Von 22 N. पृ. ६०–६४

सिद्धांत, सूर्यसिद्धांत, ब्रह्मसिद्धांत या ग्रंथांवरून येत नाहीं, परंतु ग्रहलाघवाचे स्फुट गतीने मात्र अधिवत्सर येतो. त्यास येविसीचा निषेध नर्मदोत्तर. दक्षिण देशी विवाहादिक मांगल्य कार्यें केल्यास प्रत्यवाय नाहीं."

यावरून ग्रहलाघवाचें प्राबल्य आपल्याकडील प्रांतांत होतें असें दिसून येतें.

---

# १८ गौरीशंकर ज्योतिषी–दिल्लीकर

( श्री. **भास्कर रामचंद्र भालेराव**, ग्वाल्हेर )

कालमानाप्रमाणें धर्म व नीतीच्या कल्पना बदलत असतात. मराठेशाहींत यज्ञयाग, पुरश्चरणें, जपजाप्य, ज्योतिष वगैरे बाबतींत, मोठ्यापासून लहानापर्यंत; किती विश्वास असे, ही गोष्ट तत्कालीन कागदपत्रांवरून चांगल्या प्रकारें लक्षांत येतें. तीच परंपरा उत्तर हिंदुस्थानांत मराठी राज्य फैलावल्यावर इकडील मराठे वीर–मुत्सद्यांतही दिसून येतें. पाटिलबाबा महादजी शिंदे पुण्यास गेल्यानंतर मागें उत्तर हिंदुस्थानाचा बंदोबस्त नीट राहण्यास "श्रीमंत येजमान ये तोपर्यंत शत्रूंनीं डोकें उचलूं नये म्हणून कुळस्वामी व इतर देवतादिकांस नवससायास" व "होळकराचा पराभव होउन सरकार नक्ष राहावा म्हणून नवसाप्रीत्यर्थ" सुभेदार खंडेराव हरी भालेराव राजा समशेर बहादुर महादजी शिंद्यांचें सेनापति व दिल्लीचे किल्लेदार यांनीं लिहलेल्या दोन याद्या आमच्या घराण्याच्या दफ्तरांत उपलब्ध झाल्या आहेत. रावबहादूर सरदेसाई त्या याद्या पाहून उद्गारले 'याला इतिहास म्हणतां येईल काय?' पण इतिहासाचार्य राजवाड्यांच्या मतें राष्ट्राचा सर्वांगपूर्ण इतिहास प्रसिद्ध करण्यासाठीं प्रमुख व्यक्तींचे खासगी आचार–विचार धार्मिक समजुती वगैरे बाबतींचें प्रकाशन होणेंहि आवश्यक होय. तसल्याच प्रकारची माहिती प्रस्तुत टांचणद्वारें सादर करीत आहे.

माझ्या घराण्याच्या कैफियतींत असें आलें आहे कीं, खंडराव हरीनीं स. १७९२ त बादशहाच्या इच्छेप्रमाणें पठाण सरदार नजफ कुळीखानाच्या ताब्यांत असलेला कानाडे किल्ला सर केला व तेथें यवनांच्या संसर्गानें अपवित्र झालेल्या सदर किल्ल्यांत पशुयाग केला व तत्प्रीत्यर्थ भाकरी गांव अग्रहार देऊन तेथें

'पापक्षालन तीर्थ' कायम केलें. ही माहिती आतां मंडळानें प्रसिद्ध केलेल्या 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्तरे कडील विस्तार' ह्या निबंधांत ४८० व्या पृष्ठावर भाकरी गांवाची जी त्रोटक हकीगत दिली आहे त्यावरून व माझ्या संशोधनावरून चुकीची ठरली आहे.

त्या काळीं गौरीशंकर जोशी नामक एक शाकद्वीपी ब्राह्मणाचें मोठें प्रस्थ दिल्ली प्रांतीं होतें. तो मूळचा बिहार प्रांतांतील एका खेड्यांतील गृहस्थ, पण ज्योतिष, योग, मंत्रतंत्र, पुरश्चरण वगैरे बाबतींत त्याचा बराच लौकिक असल्यानें, तो दिल्ली प्रांतीं जातांच तेथें बादशहा, नबाब वगैरे बडीं बडीं माणसें त्याच्या नादीं लागलीं व त्याचा बराच बडेजाव झाला. त्यामुळें त्यास देणग्या, इनामी गांवें वगैरेंचाही बराच लाभ झाला! पुढें मराठ्यांचा त्या प्रांतीं शिरकाव होतांच तेही सदर जोशीबोवाच्या नादीं लागले. त्यास मिर्झा नजफ कुलीखान कानोडचा जाहगीरदार यांजकडून भाकरी गांव जाहागीर मिळाला होता. पण अप्पा खंडेरावांची तेथें सत्ता स्थापन होतांच त्यांच्या वतीच्या कमाविसदारांनीं जोशांच्या वहिवाटीला जुमानलें नाहीं. तेव्हां जोशीबाबांनीं बादशहा, महादजी बाबा, खासे श्रीमंत सवाई माधवराव पेशवे साहेब, मराठे–मुसलमान इतर सरदार व खुद्द खंडेराव हरी यांस इरेस घालून आपल्या भाकरी वगैरे गांवांच्या नवीन सनदा करून घेतल्या व निरनिराळ्या कमाविसदारांच्या नांवावर ताकीदपत्रेंही हस्तगत केलीं. त्यांजपैकीं कांहीं सनदा सादर करीत आहे. ग्वाल्हेर राज्यांतील तवरघार जिल्ह्यांत जोरा–सिकरवारी तालुक्यांत निधान नांवाचा गांव महादजीबाबांनीं गौरीशंकर जोशांस स्वतंत्रपणें इनाम दिला होता. पण तो आतां जप्त करण्यांत आला असून हल्लीं जोशी–बाबांचे निरनिराळे वंशज त्यांच्या जमीदारी हक्कांवर भोगवटा करून आहेत. त्यांच्या वंशजांच्या सहा शाखांपैकीं एकटे पं. विश्वेश्वरीप्रसाद शर्माच काय तें विद्यासंपन्न गृहस्थ असून पी. डब्यू. डी. खात्याच्या बिल्डिंग विभागांत, डिस्ट्रिक्ट इंजिनियर, ग्वाल्हेरीस होते. हल्लीं ते पेन्शनर आहेत. त्यांनीं "नक्षत्र विज्ञान" नांवाचा खगोल शास्त्रावर एक ग्रंथ लिहिला असून ते ग्वाल्हेरच्या सनातन धर्म मंडळ संस्थेचे संस्थापक व चालक आहेत.

जोशांच्या निरनिराळ्या वंशजाच्या ताब्यांत बरींच कागदपत्रें आहेत, पण भाऊबंदकीच्या भांडणामुळें ते त्यांच्या नकला देखील करुन देण्यास तयार नाहींत. खुद्द पेशव्यांच्या एका पत्रांत मुहूर्त दाखविण्याबद्दलचा स्पष्ट उल्लेख आहे. दौलतराव शिंदे यांनीं जोशी बाबांस खालील पत्र पाठविलें होतें, त्यांत निजामाची मसलत व दसऱ्याच्या सुमुहूर्तें कूच करण्याचा मनोदय जाहीर करून ताबडतोब पुण्यास येण्याचें निमंत्रण पाठविलें आहे. पत्राची प्रतिलिपी खालीलप्रमाणें आहे. विषयानुरोधानें खर्ड्यांच्या स्वारीबद्दलचें पत्र आधीं देत आहे.—

{ श. १७१६ भाद्र. व. ७
{ इ. १७९४ सप्टें. १४

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजेश्री--

गौरीशंकर बाबा जोशी स्वामीचे सेवेसी सेवक दौलतराव शिंदे दंडवत विनंती उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय लिहीत असावे विशेष सरकारातून नबाब निजाम अलीखान बहादर याची मसलत दरपेश आहे. या प्रसंगी तुमचें प्रयोजन जाणोन हें पत्र तुम्हांस लिहिलें आहे तरी तुम्हीं पत्र पावतांच निघोन येणें. मथुरेहून आगऱ्यास येणें आगरवाले ग्वाल्हेरी पावेतो रवाना करतील. तेथून पुढेंही कादारास पत्रें व दस्तक मार्गाचें पाठविलें आहे. लौकर येऊन पोहचणें. दसरेचे मुहूर्तें स्वारींचें कूच होणार यास्तव लौकर येऊन पोहचणें. पत्र पावतांच निघोन दर मजल येऊन पोचणें रवाना छ १९ सफर सुाा खमस तिसन मया व आलफ बहुत काय लिहणें हे विनंती. मोर्तब सुद ( गोल शिक्का )

[ खर्ड्यांच्या स्वारी पूर्वींच पेशव्यानीं खंडेराव हरी यांस खालील पत्र पाठविलें होतें. ]

{ श. १७१३ आश्वीन शु. १३
श्री { इ. १७९१ आक्टोबर ९

अखण्डित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री खंडेराव हरी कमाविसदार प्राा रेवाडी महालानिहाय गोसावी यांसी

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सुाा इसन्ने तिसेन मया व अलफ मौजे भाकरी व मौ सहबेरापूर सरकार नारनोल हे दोन्ही गांव XXXX सरकारांतून वेदशास्त्रसंपन्न गौरीशंकर जोशी वास्तव्य कसबे पहाडगड यांस देऊन भोगवट्यास अलाहिदा सनद करून दिली असे. तरी तुम्हीं सनदा बरहुकूम सदरहू दोन्हीं गांवें जोशी यांजकडे चालविणें. हेविसींचा फिरोन बोभाट येऊं न देणें. जाणीजे छ १० सफर आज्ञाप्रमाण लेखन सीमा ( गोल शिक्का ).

बार

[ पेशवे सरकारांतून एक फारशी पत्र–आमिलान परगना हवेली सरकार नारनौल यांचें नांवे पाठविण्यांत आलें होतें. त्यांत बमूजिब परवाना नजफ कुळीखां ११ जिल्हेज सन ३२ जुलूस रोजीं सदर दोन्ही गांवें चालू करण्याची आज्ञा दिली गेली होती. सदर पत्रावर मोहर काजी अलकज्जातची असून पेशव्यांच्या मोठ्यां फारशी शिक्क्यांत लांबलचक बादशाही पदव्यांचा उल्लेख केला गेला आहे. पेशव्यांच्या वाटोळ्या शिक्क्यावरील मजकूर वाचनीय आहे. ]

एक आणखी पत्र उपलब्ध झालें असून त्यांत आरंभीं फारसी मजकूर आहे. तसेंच 'असनाद हुजूर महाराजाधिराज ( पेशवे ) व परवाना वागुजाइन बमोहर राजा अप्पा खंडेराव समशेरजंगबहादुर'चाहि उल्लेख असून त्याच्या खालीं मोडींत तर्जुमा दिला आहे. तें त्यांच्या कमाविसदाराकडून पाठविण्यांत आलें असावें असें वाटतें. ( इसन्ने तिसेन मया व अलफ ७ सफर = श. १७१३ आश्वीन शु. ९ = इ. १७९१ आक्टोबर ६ )

खंडेराव हरी यांनीं अमृतराव अनंत कमाविसदार परगणे नारनोल यांस पाठविलेल्या सदरच्या पत्रांत, सरकारचे परवानगी वरोन नजब कुलीखान यांनी गांव करून दिलें. त्यावरून, हल्लीं त्यांस जागीर करून दिल्याचा उल्लेख आहे. अप्पा खंडेरावानीं ४ रबिलावल रोजीं सदर अमृतरायासच खलत व उपद्रव न देण्याचा उल्लेख केला आहे. एक आणखी निनांवीं पत्र ९ रबिलाखरचें मु. लष्कर नजीक बावड्याखेडीचें उपलब्ध झालें आहे. त्यांत मजकूर कीं "राजश्री गौरीशंकर जोशी यांजला श्रीमंत राजश्री दवलतरायबावानीं बोलावण्याविषयीं पत्रें वरचेवर येतात. ते जावयास तयार जालें परंतु त्यांचें गांव नारनोलचे आहेत. ते आपण जप्त केलें.... त्यांसी उभयतां सरदारांनीं आम्हांस समक्ष सांगितलें कीं जोशीबाबांचें गांव सोडून द्यावें. तरी जप्ती पाठविली असल्यास सोडून द्यावी." हें पत्र कदाचित् शिंद्यांचें सरदार गोपाळरावभाऊ यांनीं खंडेराव हरीस लिहिलें असावें.

शेवटचा परवाना नजाबत अलीखान यानें १२२३ हिजरी रजब २ सन ३ जुलूस ( अकबरकालीन ) रोजी पाठविला. त्यात बमूजिब परवानेजात नजफकुलीखान, महाराजा माधवराव नारायण व अप्पा खंडेराव व परवाना कर्नेल अख्तर लूनी साहेब-बहादूर मौसूमे राव रामचंद्र व सेवाराम ( ३ मई १८०४ ) चा उल्लेख आहे.

वरील अस्सल पत्रांच्या नकलांवरून दिल्लीप्रांतीं मराठ्यांनंतर कंपनीचें राज्य झाल्यावर जनरल अख्तर लोणी कडूनही सदर गांवें आपल्या कडेस करून घेतल्याची जोशी बुवांच्या खटपटीची नीट कल्पना येते. गौरीशंकर जोशांस हें उत्पन्न त्यांच्या ज्योतिष विद्येच्या प्रभावामुळेंच मिळालें होतें, व विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं मुसलमान-सरदार देखील त्यांच्या कच्छपीं लागलें होतें. अशा गुणी माणसाची बूज मराठी राज्यांत होणें सर्वथा साहाजिकच होते; सबब या सम्मेलन प्रसंगीं ही माहिती मांडली आहे.

(१)

फिद्वी शाह आलम बादशाह गाजी
पंतप्रधान महाराजाधीराज
सवाई माधवराव नारायन
बहादूर सआदत मंद बजापै वंद
फरजन्दे खासुल खास सरदारे
कबीरुल इफ्तखार यारे वफादार
सिपह सालार मुअल्ला जाह
मदारुल महामुस्सलतनत उमदतुल
अकारिबुल खिलाफत वकील
मुतलक अमीरुल उमरा मुख्तारुल
ममालिक

मोहर काज़उिल
कुज्ज़ात
( गोल शिक्का )

आमिलान हाल व इस्तकबाल परगना हवेली सरकार नारनोल मुजाफ सूबा दारुल खिलाफत शाहजहानाबाद बिदानंद गौरीशंकर मुनज्जिम इल्तमास नमूद के मौजा भांकरी व शहबेगपूर अमला परगना हवेली मजकूर बमूजिब परवाना नजफकुली खां बहादुर मरहूम याज्दहुम जिल्हेज सन ३२ दरवजह मदद मुआश शुभचिंतक (?) मुकर्रर अस्त उम्मीदवार फज्ल व करम के परवाना सरकार मरहमत शवद लिहाजा निगारश मे रवद के मवाज़े मजकूर बइस्मे मुशारुनइलैह अज सरकार मुकर्रर व बहाल दाश्ता शुद बायद आंहा...देहात मजकूर बदस्तूर साबिक...सिवाए सायर व अराजी व इम्लाक व बागात बतसुर्रफे मशारुनइलैह रागुजारन्द के हासिलात आंरा...सर्फे मायहताजे खुद नमूदा बदुआय दवाम दौलत अबद मुद्दत मुवक्किफ (?) बाशद दरीं बाब ताकीदे अकीद व कदगन मजीद दानिस्ता हस्बुल मस्तूर बअमल आरन्द फकत

दो मौजा

(२)

आलीजाह बहादूर दाम इकबालहू

जमीदारान मौज़ा भाकरी व शाहबेगपुर अमला परगना नारनौल मुजाफ सूबा दारुल खिलाफत शाहजहानाबाद बिदानंद मवाज़े मजकूर बजूमूजिब असनाद हुजूर महाराजाधीराज व परवाना वागुजाश्त व मोहर आप्पा खंडेराव राजा शमशेरजंग बहादूर जागीर इनाम बसीगे यादोराव जोतशी गौरीशंकरजी वागुजाश्त

नमूदा शुद बायद के पेश... मशारुन इलैह हाज़िर तवज्जुह शुदा रगबत कुनंद. बकार बुरन्द दरीं बाब ताकीद अकीद शनासन्द

भाकरी मवाजेआत
नीम शाहबेगपुर
नीम

ताहां मुकादम मौजे भाकरी व मौजे सहबेगपुर पाा नारनोल सुाा इसने तिसैन मया व अलफ छ ७ सफर.

---

## ५ तात्त्विक–वृत्तांतपर

# १९ देशमुखी वतन



( श्री. शं. ना. वत्स जोशी )

'देशमुखी वतन' हें सर्व वतनांत श्रेष्ठ वतन आहे. ह्याचें महत्त्व देशव्यवस्था आणि राज्यकारभारपद्धती ह्या दोन्ही दृष्टींनीं अतिशय आहे. ह्या देशमुखी संस्थेचें काम, मानपान, आणि हक्क व ह्या संस्थेचा व्याप; तसेंच ह्या संस्थेविषयींचे अनुकूल-प्रतिकूल उल्लेख पाहिले असतां इतकी गुंतागुंत त्यांत दिसून येते कीं, त्यामुळें ह्या संस्थेचा स्वरूपाविष्कार पूर्णपणें व नेमका होणेंहि कठिण होऊन बसलें आहे. अशा ह्या महत्त्वाच्या, गुंतागुंतीच्या पण अत्यंत आवश्यक असलेल्या संस्थेसंबंधानें, सामान्यतः शिवकालास अनुसरून, येथें कांहीं विचार मांडण्याचें योजिलें आहे.

१ 'देशमुख' ह्या शब्दांतील 'देश' व 'मुख' हीं दोन्ही पदें संस्कृत असलीं तरी देशमूख असा सामासिक शब्द संस्कृत वाङ्मयांत नाहीं. अर्वाचीन म्हणजे शक तेराशें पुढील संस्कृत ग्रंथरचनेंत कदाचित् आढळेल. तत्पूर्वी ह्या शब्दाचें काम 'विषयपति' ह्या संज्ञेनें होत असे. 'ग्रामपति'; 'विषयपति', 'राष्ट्रपति' अशा चढत्या संज्ञा ताम्रशिलाशासनांत येतात. 'आहार', 'भूति', 'मंडल', 'देश' ह्याहि संज्ञा मुसलमानपूर्व राजवटींत येतात आणि त्यांत देश शब्द आहे. तथापि, ज्याचेपासून मुख हा शब्द साधितां येईल असा मुख्यः किंवा मुखं, मुखी हा शब्द त्यास जोडलेला नाहीं. सारांश, 'देशमूख' हा शब्द मुसलमानोत्तर अधिक प्रसृत व रूढ झाला हें म्हणणें इष्ट होईल. येथेंच हेंहि सहज लक्ष्यांत येणारें आहे कीं, ग्रामपति, विषयपति, आहारपति ह्या सामासिक शब्दांतील पूर्वपद, गणपति, नरपति, ह्याप्रमाणें समुदायबोधक नसून एकत्वबोधक सम-

जावयाचें. जर तसें न समजलें तर इतर शब्दांना वैयर्थ्य येऊन अनवस्था प्रसंग येईल. देशमूख ह्या शब्दांतील देश ह्या पदानें एक देश म्हणजे एक परगणा, एक प्रांत घ्यावयाचा. देशमूख ह्या शब्दाच्या जोडीला देसाई, नाडगौडा हे दोन शब्द योजिलेले आहेत. पण ते कोंकणांत व कर्नाटकांत अधिक प्रमाणांत आढळतील. त्याबरोबर हेंहि लक्ष्यांत घेतलें पाहिजे कीं, महाराष्ट्रांतील देशमूख, बाहुल्यानें मराठाज्ञातींतील आहेत; तसेंच कोंकणांतील देसाई ब्राह्मण व कर्नाटकांतील नाडगौडा लिंगाईत ज्ञातींतील आढळतील. कर्नाटकांतील हे नाडगौडा पुढें मराठ्याचे लिंगाईत झालेले आहेत. 'नाड' म्हणजे प्रांत व 'गौडा' म्हणजे पाटील. हा गौडा शब्द कसा झाला हें अमळ लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. तिकडे ग्रामगंड असा संस्कृत–कानडी समास ताम्रपत्रांत येतो. गंड म्हणजे पति. ग्रामगंड ह्यापासून गाउंड, गावुंड व त्यापासून गौडा हा शब्द साधित झाला व तो पाटील ह्या अर्थी रूढ झाला. आपल्याकडील गावगुंड हा ह्या वेळीं साक्षेपी वाचकांच्या ध्यानीं येईल. असो. कर्नाटकांत देसाई ही संज्ञाहि पत्रव्यवहारांत येते; पण ती नाडगौडाच्या मानानें अर्वाचीन वाटते. महाराष्ट्रांत देशमूख म्हणजे तरी देशाचा, प्रांताचा पाटीलच आहे. देसाई शब्द देशस्वामी किंवा देशपति ह्यापासून बनला आहे. त्यांतहि देशपति ह्या शब्दापासूनच देसाई ह्याची उपपत्ति अधिक सयुक्तिक वाटते. कर्नाटकांत देसाई व नाडगौडा हे दोन्ही शब्द कागदपत्रांतून आले आहेत. त्यांतहि नाडगौडा हा शब्द किल्लाप्रमुख देशविभागाला लावलेला आहे. श्रीनिवास वेंकटाद्री हे गदग परगण्याचे देसाई व नाडगौडाहि आहेत. (शि. च. सा. खं. ६ले. २० पहा.) येथें हे दोन्ही शब्द भिन्नार्थक आहेत हें उघड आहे. धारवाडचे देसाई हेहि नाडगौडा आहेत. नाडगौडकींचें वतन किल्लेदाराशीं संबद्ध आहे ( कित्ता ले. ५ पृ. ५ व ले. २५ पहा. ).

देसाई, देसगत, जमेदार हे शब्द सामान्यतः देशमूख ह्या संस्थेचेच वाचक आहेत. ह्यांतहि मुसलमानी अधिकारी पत्र इत्यादि लिहितांना जमेदार, देशमूख, देसाई हे शब्दच प्रामुख्यानें योजतात. जमेदार ह्याचा मूळ शब्द झमीन्दार ( जमीन बाळगणारा ) हा आहे. सभासदी बखरींत 'जमीदार व मोकासी एक जाहालियानें ते व रयत बेकैद होतील आणि कमाविस ( = वसूल ) होणार नाहीं' असें जें म्हटलें आहे त्यांतील जमीदार हा शब्द देशमूख ह्या अर्थीच मुख्यतः आहे.

'देशमूख' ह्या शब्दाचा प्रतिशब्द म्हणून जो चुकीचा एक शब्द सांगितला गेला आहे असें वाटतें; विशेषतः शिवाजीचे देशमुख कोण ह्याचें प्रतिपादन करीत असतां सांगितला आहे, त्याचा थोडक्यांत येथें विचार करणें प्राप्त आहे. शिवाजी महाराजांची राज्यपद्धति संस्कृतांतील प्रसिद्ध शुक्रनीतिसाराशीं संनिकट असून प्रागतिक प्रवृत्तीची दिसते हें सांगतांना प्रो. शेजवलकर म्हणतात 'शिवाजीचे

देशमूख ( साहसाधिपति ) व पाटील ( भागग्राही ) हे मराठेच असत. ' ( भा. इ. सं. त्रै. व. ४ पृ. ७७. ) श्री. शेजवलकरांचें हें म्हणणें त्यांनींच उद्धृत केलेल्या वचनार्थाशीं जमणारें नाहीं. भागग्राही क्षत्रियस्तु साहसाधिपतिश्च सः । शुक्रनीतिसार. ( ह्यांतील साहसाधिपति व भागग्राहि ह्या संज्ञा शुक्रनीतीमधील अ. २ श्लोक १२० मध्यें आल्या आहेत.

साहसाधिपतिं चैव ग्रामनेतारमेव च ।
भागहारं तृतीयं तु लेखकं च चतुर्थकम् ॥

हा श्लोक राजानें आपले अधिकारी कोठें कोठें व कोण नियुक्त करावेत हें सांगत असतां आला आहे. नीतिसारांतील भागग्राहीच्या जागीं येथें भागहारी हा शब्द आहे. पण त्यामुळें त्याच्या अर्थांत अंतर पडण्याचें कारण नाहीं. साहसाधिपति म्हणजे दंडाधिकारी. साहस = दंड ( साहसं तु दमो दंडः । अमरकोश ) भागग्राही किंवा भागहारी म्हणजे कमाविसदार, वसूल गोळा करणारा. दंडाधिकारी ह्याला सध्यांचा फौजदार हा शब्द सांगतां येईल व तो गीर्वाण कोशामध्यें सांगितलाहि आहे. तात्पर्य, साहसाधिपति व भागग्राही ह्या दोन्ही शब्दांचे देशमूख व पाटील हे अर्थ युक्त वाटत नाहींत. शिवाय हे राजानियोजित आहेत शिवकालीं व मुसलमानी अमदानींत देशमूख ह्या शब्दास दुसरा शब्द 'जमीदार' हा आला आहे हें व मुसलमानपूर्व कालांत ' विषयपति ' हाच शब्द देशमुखसंज्ञेशीं अधिक जवळचा आहे हें, वर दिलेंच आहे.

**२ देशमुखीचें महत्त्वः–** ह्या देशमुखीचें महत्त्व केवढें आहे हें व्यतिरेकानें प्रथम पाहूं. म्हणजे त्याचा निषेध जेथें केला तेथील उल्लेख एकप्रकारें पाहण्याजोगे आहेत. अमात्य आपल्या राजनीतींत म्हणतात—

" राज्यांतील देशमूख आदिकरून यास ' वतनदार ' ही प्राकृत परिभाषा मात्र आहे. ते स्वल्पच परंतु स्वतंत्र देशनायकच आहेत. त्यांस साधारण गणावें असें नाहीं. हे लोक म्हणजे राज्याचे दायादच आहेत. " वि. ज्ञा. वि. आवृत्ति पृ. २९

सभासद आपल्या शिवाजी चरित्रांत पृ. २९ वर म्हणतात—

" इदलशाही, निजामशाही, मोगलाई देश कबज केला, त्या देशांत मुलकांचे पाटीलकुलकर्णी व देशमूख यांचे हातीं कुल रयत"[1]

---

१ असेंच सभासद बखरीची वाढ केलेल्या चित्रगुप्त विरचित बखरींतहि आहे. पण सभासदी बखरींचें अनुकरण केलेल्या शेडगांवकर बखरींत नेमकें विरुद्ध लिहिलें आहे. तसेंच मल्हार रामराव यांचे बखरींत व राजनीतींतहि अमात्य–नीतींतील उल्लेखा-विरुद्धच मजकूर आहे. उत्तरकालीन लिखाण कसें असतें व कां अप्रमाण तसेंच वतना-सक्ति केवढी हें ह्यावरून सहज दिसून येईल.

ह्या दोन उताऱ्यांवरून ध्यानांत येईल कीं, शिवकालाचे प्रारंभीं देशव्यवस्था पूर्णपणें ह्या वतनदार मंडळींच्या आधीन होती. गांवची रयत, गांवचें शिवार म्हणजे गांवाखालील शेतीची, व चराऊ अथवा पड भूमी ही सर्व पाटलाचे ताब्यांत आणि परगण्यांतील रयत व भूमी देशमुखांचे हातीं. म्हणजे राज्य चालविण्यास राजाला जो पैका व धान्यादि सामग्री पाहिजे ती ह्या देशमुख–देशपांडे वतनदारांकरवीं मिळावयाची. देशमुखदेशपांड्यांच्या जोडीला राज्यसूत्र-चालकांकडून सुभेदार नेमलेले असतात; पण तेहि देशमूखदेशपांडे हे आपलें काम बरोबर करतात न करतात हें पाहण्यासाठीं असतात. म्हणजे त्यांनींहि देशमुखादिकांचेकडूनच हें वसुलीचें काम करवून घ्यावयाचें आहे; स्वातंत्र्यानें नाहीं. तात्पर्य, देशमूख हे परगण्यासाठीं सरकारला जबाबदार. सरकारचा व रयतेचा प्रत्यक्ष संबंध केव्हांहि व मुळींच नाहीं. असा प्रकार असल्यामुळेंच लेखाच्या प्रारंभीं देशव्यवस्था व राज्यकारभारपद्धति हे दोन विभाग दिले आहेत. प्रस्तुत राज्यकारभारपद्धतीविषयीं पाहावयाचें नाहीं, देशव्यवस्थेविषयींच मुख्यत: पाहावयाचें आहे व त्यासाठीं देशमूख ह्या वतनसंस्थेविषयीं माहिती मिळविणें इष्ट आणि त्यांतील जेवढा तपशील पाहतां येईल तेवढ्या प्रमाणांत देशव्यवस्थेची बाजू आपल्या निदर्शनास येईल.

३ राजप्रधानादिक सर–कारकून मंडळी आणि हे परगण्याचे वतनदार लोक जेव्हां एकत्र एखाद्या निर्णयसभेमध्यें उपस्थित असतात तेव्हां ह्या देशमुख वतनदारांची प्रतिष्ठा केवढी मोठी आहे हें दिसून येतें. एकदां म्हणजे इ. स. १७१८ आक्टोबर (१६४० आश्वीन) मध्यें सातारा किल्ल्यावर दाभोळचे देशमुख व रायरी मामल्याचे सरदेशमूख असलेले शिर्के मंडळींत, सरदेशमुखी व देशमुखी वतनाविषयीं भांडण लागलें होतें; व त्याच्या निर्णयासाठीं सर्व प्रधान, बरेचसे सरदार, देशमूख, पाटील इत्यादि प्रमुख मंडळींची सभा भरली होती. ह्या निर्णयसभेस अष्टप्रधान व त्यांचे हाताखालील इतर अधिकारी १८ आले आहेत; तसेंच सरलष्करादिक सरदारमंडळीहि २७ आहेत. आणि नंतर देशमूख, पाटील मंडळींचीं नांवें सभेस उपस्थित होते त्यांचीं दिलीं आहेत. ह्यांत विशेष कौतुकाची व आवर्जून उल्लेख करण्यासारखी गोष्ट ही कीं, ह्या निर्णयसभेंत छत्रपती शाहूमहाराज हे उपास्थित आहेत; पण ते राजमुद्राधिकारी ह्या नात्यानें प्रारंभीं म्हणजे कागदाच्या अगदीं डोक्यावर अष्टप्रधानादि मंडळी आहेत तेथें नसून देशमूख मंडळींची जेथें नोंद आहे तेथें त्यांचें नांव देशमूख ह्या नात्यानें आहे. तेथेंच शाहू छ० नीं आपली देशमुखीची मुद्राहि दिली आहे. शाहूराजे ह्यांनीं वांईप्रांताची देशमुखी मिळविली होती. ह्या देशमुखीचे प्रथमचे व खरे अधिकारी पिसाळ. पण सूर्याजी पिसाळ व दत्ताजी पिसाळ ह्यांचें ह्या देशमुखींतील वडिलकी व वाटा ह्यांबद्दल बराच कालपर्यंत भांडण चालूं होतें. अशांतच ही देशमुखी औरंगजेब इकडे आला असतां त्याहारखान गोरी, ह्या वांई

प्रांतावरील तेव्हांच्या मोगली अधिकाऱ्यानें आपल्या स्वतःच्या नांवावर चढवून घेतली. पुढें लवकर औरंगजेब इकडेच मृत्यु पावला व शाहूमहाराजांची सुटका होऊन ते साताऱ्यास आले तेव्हां, त्यांनीं, ही वांईची देशमुखी स्वतःकडे घेतली. आणि 'देशमूख प्रांत वाई' असा शिक्काहि करविला. आणि ह्या नात्यानें म्हणजे देशमूख म्हणून ह्या वरील सभेस ते उपस्थित आहेत. वतनपत्रें निवाडपत्रें पृ. ७४–८० पानावर हा महजर छापला आहे. ह्यावरून राजकीय मानापेक्षां समाजामधील देशमुखीमुळें मिळणारा मान हा श्रेष्ठ आहे असेंच निश्चितपणें ठरत आहे. आणि देशमुखी ही संस्था राज्यास-नाष्ठित व्यक्तीलाहि प्रलोभनीय अशी प्रतिष्ठेची व लोकमान्यतेची कशी वाटत होती हें उघड होत आहे. असाच दुसरा निर्णय राजवाडे खं. ३ पृ. १०८–१२० वर छापला आहे. हा निमसोड मायणी ह्या गांवांतील घारगे देशमुखांमधील तंट्यासंबंधीं आहे. ह्या निर्णयपत्रांत पुढें (पृ. ११८) 'महाराजसाहेब म्हणजे हिंदुपती बादशाही ईश्वराचें आधिष्ठान' असें ज्या छत्रपतींना उद्देशून गौरवून म्हटलें आहे त्या शाहू छत्रपतींनीं स्वतःचा निर्देश देशमूख मंडळींतच केला आहे. हीही सभा सातारा येथेंच श. १६४१ ज्येष्ठ शु. १ = १७१९ मे ९ रोजीं झाली. ह्या दोन्ही महजराच्या मजालसी म्हणजे निवाड्याच्या गोतसभा सातारा येथें झालेल्या आहेत हेंहि लक्ष्यांत घेतलें पाहिजे. म्हणजे अन्य कोठें तरी ही सभा–बैठक झाली व तेथें छत्रपति जाणें शक्य नाहीं म्हणून त्यांनीं आपला मुतालीक पाठविला व ह्या कारणानें छत्रपतीचें नांव हमशाही गोतांत व देशमुख मंडळींत पडलें, असें म्हणण्यास अवकाश नाहीं. ह्या सभा साताऱ्यांतच झालेल्या आहेत. राजवाडे खं.२० ले.४३ मध्येंहि शाहू छत्रपतींचा देशमूख म्हणूनच महजरामध्यें निर्देश आला आहे. ह्या सगळ्याचा अर्थ इतकाच घ्यावयाचा कीं, वतनदारांना रयतेमध्यें मान फार व त्यांतहि परगण्याचे वतनदार जे देशमूख त्यांचा मान फारच मोठा समजला जाई; इतका कीं, त्या मानाबद्दल छत्रपतींनाहि हेवा वाटावा.

४ देशमूख किंवा देशपांडे अथवा पाटील व कुलकर्णी ह्यांचा सरकारी कागदो-पत्रीं उल्लेख केला जातो तेथील त्यांचा मायनाहि येथें लक्ष्यांत आणण्याजोगा आहे. विशेषतः ज्या पत्रांत सरकारनियोजित सुभेदार व कारकून ह्यांच्याबरोबर ह्या लोक-निर्मित वतनदार मंडळींचा निर्देश केला जातो, तेथील उल्लेख अधिक लक्ष्य आहे.

'अज रख्तखाने राजश्री जिजाआऊसाहेब दामदौलतहू बजानेबु कारकुनानी हाल व इस्तकबाल व देशमुखानी व देशकुलकर्णियानि कर्यांती मावल इ.'

'अज रख्तखाने राजेश्री शाहाजीराजे...कारकुनानी हाल व इस्तकबाल व देश-मुखानी परगणे पुणें यासी.' शि. च. सा. खं. २ ले. १०८ व ले. ११७

ह्या उद्धृत केलेल्या पत्रप्रारंभीच्या मायन्यांत जिजाबाईसाहेब व शाहाजी राजे भोसले यांचे कचेरीकडून परगणे पुण्याच्या कारकुनांना व देशमुखदेशपांडे यांना उद्देशून आज्ञा केली आहे. पण ह्यांत 'हाल व इस्तकबाल' हीं विशेषणें केवल

कारकुनांनाच लावलेलीं आहेत. ‘ हाल व इस्तकबाल ’ म्हणजे ‘ आतांचे व ह्यापुढें येणारे ’ (जे कारकून त्यांना), ‘हाल ’ हें हल्ली ( सांप्रत, चालू ) ह्या शब्दाचें रूप आहे. ‘इस्तकबाल म्ह० भावी. रा. खं. १५ ले. ३७९ मध्यें हें बदलणारे अधिकारी म्हणजे कारकून व हुदेदार लोक ह्यांचा वेगवेगळा असा दोनदां उल्लेख पत्राचे प्रारंभीं आला आहे. आणि ह्या दोनही उल्लेखांत दोनदां ‘ हाल व इस्तकबाल ’ हा शब्दप्रयोग आला आहे. ह्या मायने–पद्धतीवरून देशमूख हे ‘शाश्वतचे’ अधिकारी आणि कारकून, सुभेदार हे आजचे वेगळें व पुढचे वेगळे असे बदलणारे म्ह० ‘अशाश्वत’ अधिकारी होत असें उघड दिसून येतें. शाश्वत अधिकारी व अशाश्वत अधिकारी ही परिभाषा त्यावेळीं होती व त्यांतील शाश्वत अधिकारी म्हणजे वतनदार होत.

५ देशमुखी ह्या संस्थेचें श्रेष्ठत्व आणखी एका प्रकारें निदर्शनास येतें. म्हणजे देशमुखांचा म्हणून सरकारी भूगोलाहून भिन्न असा भूगोल स्वतंत्र, असे. येथें भूगोल हा शब्द आजच्या समजुतीसाठीं भूगोलाचें पुस्तक ह्या कल्पनेनें योजलेला आहे. त्या वेळचा शब्द ‘ तुमार वासलाती ’ किंवा ‘ देह झाडापत्रक ’ अथवा ‘ धुरंग झाडा ’ हा आहे. ‘सरकारी भूगोल’ व ‘देशमुखी भूगोल’ वेगळा कसा व कां ह्याचें थोड-क्यांत स्पष्टीकरण करणें अवश्य आहे. पुणें प्रांत आपण उदाहरणार्थ घेऊं. ह्या पुणें परगण्याचे देशमूख शितोळे. पुणें परगण्यावरील राजकीयसत्ता प्रथम निजामशाहीची, त्याच्याहि आधीं बहामनीशाहीची पण ती प्रस्तुत नको. निजामशाही नष्ट होण्याच्या पूर्वींहि हा पुणें परगणा अदिलशाही व निजामशाही ह्यांच्या सरहद्दीवर असल्यामुळें त्यावर सारख्या स्वाऱ्या होत असत ( हा परगणा शहाजीकडे कां सोपविला गेला त्याचेंहि कारण सहज ध्यानीं येतें ). अशा वारंवार स्वाऱ्या होत असल्यामुळें ह्या प्रांताचें सरकारी ठाणें पुणें, भुलेश्वर अशा वेगवेगळ्या ठिकाणीं बदलेलें आहे. म्हणजे त्या त्या वेळीं ह्या परगण्यांतील कांहीं गांवांवर निजामशाही सत्ता तर कांहीं गांववांर अदिलशाही सत्ता चालू राही. पुनः निजामशाही व अदिलशाहीचा तह होई व पुनरपि पूर्ववत् स्थिति होई. शेवटीं म्ह० इ. १६३६ मध्यें निजामशाही नष्टच झाली. तेव्हां, त्यांतील गांवांची वाटणी होऊन निमा भाग दिल्लीकर मोगलाकडे गेला व निमा भाग अदिल-शाहीकडे आला. असे हे पुढें कायमचे विभाग झाले तरी किंवा मध्यंतरीं अदिलशाही-निजामशाही मधील हर्षामर्षामुळें आपत्प्रसंगानें कांहीं गांवांची देवाणघेवाण व घालमेल झाली तरी, शितोळे हे देशमूख कायमचेच व त्यांच्या अधिकारांत वा मानापानांत अथवा कामांत उणेपणा केव्हांहि आला नाहीं किंवा त्यांच्या देशमुखीविषयीं कोणी अमान्यताहि दाखविली नाहीं. म्हणजे निजामशाही विद्यमान असतां निजामशाहीच्या सत्तेतील म्हणून पुणें परगण्यांतील कांहीं गांवांची नोंद होई; तसेंच तहामुळें जीं गांवें अदिल-शाहीकडे जात त्यांची नोंद अदिलशाही सत्तेतील म्हणून नोंद होई आणि पुढें कांहीं गांवें मोगलाईतील म्हणजे दिल्लीकरांच्या सत्ताविभागांतील म्हणून तशीं नोंदलीं

गेली. म्हणजे एका पुणें परगण्याचे सर्व गांव पहावयाचे झाल्यास सरकारी रीत्या तीन सत्तांमधील देहझाडे पहावे लागतील, पण स्वतः शितोळे देशमुखांच्या दप्तरीं जी नोंद नेहमींची राहील तींत मात्र असा प्रकार असण्याचें कारण नाहीं.

ह्यावरून देशव्यवस्थेसाठीं देशमुखांचा भूगोल हा स्थिर व प्रमाण होय. ह्यावरून देशमुखांचा देशविभाग हा कायम व त्याबरोबर त्यावरील देशमूख हे शाश्वत अधिकारी असें जें वर म्हटलें तें कसें सयुक्तिक हें ध्यानीं येईल.

६ देशमुखी ही संस्था केवढी मोठी आणि प्रतिष्ठेची आहे हें लेखाचे प्रारंभीं, त्या संस्थेच्या निषेधात्मक उल्लेखांतून म्हणजे व्यतिरेकरूपानें दाखविलें. आतां स्वतः हे वतनदार आपल्या वतनाविषयीं कसें आढ्यतेनें बोलतात तें म्हणजे अन्वयरूपानें दाखवून ह्या देशमुखी वतनाच्या अंतर्गत माहितीविषयीं पाहूं.

शिवचरित्रसाहित्य खंड ३ ले. ६११ मध्यें ' इंदापूर परगण्यांतील खुद्द इंदापूर कसब्याच्या पाटिलकीबद्दल वाद उत्पन्न झाला असतां पाटिलकी, देशमुखी इत्यादि जे वतनदार त्यांविषयीं बोलणें चाललें आहे व तेथें म्हटलें आहे " पांढरीवरी शतं भीष्म होऊन गेले असतील. सातपांचसें वर्षें वतनावरी नाहीं तो आजी वतनावरी उभा राहिला ...ऐसी ( काय ) गोष्टी आहे ! "

ह्याच पत्रांत ' ज्या गांवास पाटील नाहीं तेथें देशमुख पाटील व कुलकरणी नाहीं तेथें देशपांडे कुलकर्णी हा दस्तुर बुनियाद आहे, नवा नाहीं ' असेंहि वाक्य आलें आहे.

ह्या उताऱ्यामध्यें वतनाविषयीं वतनदारांची काय समजूत असे हें स्पष्टपणें आलें आहे. तसेंच वतनदारांपैकीं, ज्या देशमूख वतनदारासंबंधानें प्रस्तुत विवेचन चाललें आहे त्या देशमुखीविषयीं कांहीं अंतर्गत माहितीहि आली आहे.

येथें एक गोष्ट लक्ष्यांत येते ती अशी कीं, वतनदारांना येथें वृत्तिवंत असें संबोधिलें आहे. इतरत्रहि अनेक ठिकाणीं वतनास वृत्ति हाच शब्द योजलेला आढळतो. पण अमात्यांच्या राजनीतींत वतनदार वेगळे आणि वृत्तिवंत वेगळे, अशीं दोन स्वतंत्र प्रकरणें कल्पून सांगितलें आहे. तेथें ह्या दोघांमधील भेद ज्या गुणलक्षणांनीं स्पष्ट केला आहे तो युक्तच आहे. पण प्रत्यक्ष व्यवहारांत ह्या ऐतिहासिक कागदपत्रांत तसा विवेक केलेलीं स्थळें जवळजवळ नाहींत म्हटलें तरी चालेल. असो.

वरील उताऱ्यांत वतनदार व राजे लोक ह्यांतील तुलना अभिप्रेत आहे. राजे कितीहि आले तरी ते आले तसे जातील. तसेंच ते कितीहि बलिष्ठ असले तरीहि वतनें नष्ट करून त्यांचें चालणारहि नाहीं. एवंच आपण " वृत्तिवंत म्हणजे वतनदार हे येथील चिरस्थिर होत. आपणा आपणांत वतनभाऊपणा आहे. एकाच्या वतनावरी दुसरा उभा राहूं देणें ही भाऊपणाची नीति नव्हे. प्रसंगीं मार खावा, बंदी

पडावें ( परंतु वृत्तीस दुसरा जडो देऊं नये ) ही वृत्तिवंताची नीति आहे. " वरील तुलनेंत पांढरीवरी शतं भीष्म होऊन गेले ह्या वाक्यांतील पांढरी शब्द हाहि लक्ष्य आहे. काळीवरी म्हणजे शेतवाडीवर शतं भीष्म होऊन गेले असा प्रयोग नाहीं. म्हणजे शेतजमिनीशीं ह्या राजे मंडळींचा संबंध नाहीं, हाहि अर्थ पांढर व काळी ह्या शब्दयुग्मापैकीं पांढर शब्द लक्षांत आणला म्हणजे हा बारीक श्लेष ध्यानांत येईल.

**७ देशमुखी वतनाचीं कामें:**–वरील उताऱ्यांतील उत्तरार्धांत ज्या गांवीं पाटील नाहीं तेथील पाटिलकी देशमुखांची असा एक न्याय सांगितला आहे. ह्यावरून परगण्याच्या देशमुखाकडे केवढा अधिकार व त्या देशमुखाच्या कामाचा व्याप केवढा मोठा तोंहि निदर्शनास येतो. ह्या देशमुखी संस्थेची निर्मिति कशासाठीं व कोणाकडून तें पे. द. भा. ३१ ले. १ मध्यें आलें आहे. व त्यावरून देशमुखीच्या अधिकाराची व व्यापाची कल्पना स्पष्ट होईल. देशमूख हे राजसत्तेकडून स्वतःच्या म्हणजे राजसत्तेच्या हितासाठीं स्वसत्तेंतील कांहीं अंश देऊन लोकांचे, पण सरकारी सत्तेस जबाबदार असलेले प्रतिनिधि म्हणून मान्य केलेले दिसतात. पेशवे दप्तरांतील लेखांत हेंच कसें निर्दिष्ट आहे तें पहा.

बहमनी पातशाहाचे वेळीं इ. स. १४२६ मध्यें जुन्नरकडे भीवरा म्हणून एक मवासी राजा होता. तो भीमानदीपासूनच्या मुलखाचा पैका घेत असे व बहामनी पातशहाचा अमल कांहीं बसूं देत नसे. हें पाहून एका मजलसींत ह्या भीवराचा बंदोबस्त कसा करावयाचा ह्याबद्दल विचार झाला. त्यांत भीवराला जिंकण्याबद्दल कोणी अमीरउमराव विडा उचलेना. पण तर्फ वाडेपैकीं ८४ गांवांचा अंमल मी बसवून पैका घेऊन येतो, असें भीवराव सावंत ह्यानें त्या सभेंत सांगितलें. त्याबरोबर त्यास तेथील देशमुखी चौथाई हक्कासह देण्याचें मान्य करून परवाना दिला.

ह्यावरून देशांत आपली सत्ता चालू व्हावी म्हणजेच देशांतील रयतेकरवीं आपल्याला दिवाणदस्त म्हणून जो कर म्हणजे महसूल यावयाचा तो मिळावा व ह्यासाठीं तेथील पहिले, बलिष्ठ आणि बादशाही अंमल न मानणारे राजे लोक त्यांचाहि परस्पर बंदोबस्त व्हावा म्हणून रयत लोकांतीलच जे अधिकारी ते देशमूख झाले. हा देशमुखी निर्मितींतील एक प्रकार होय. मुख्यतः प्रांत–वसाहत व लावणी उगवणी हें देशमुखीचें आद्य कर्तव्य आणि त्यासाठीं तिची निर्मिती. पुढें देशमुखी ही संस्था राजमान्य झाली. देशमुखापैकीं बहुतेक सर्व देशमुखांचे आजचे उगम मुलूख लावणींत व तेथें राजसत्ता चालू करण्यांत दिसून येतात.* त्यांतहि 'गांव वसाहत व लावणी,

* हांडे ( जुन्नर ) यांची देशमुखी तरवारीच्या बळाची जाली–सनदापत्रें पृ. ७०

हेंच मुख्य काम व पुढेंहि हेंच त्यांचें मुख्य काम म्हणून समजण्यांत आलें आहे. पे. द. ३१ ले. १६१ मध्यें म्हटलें आहे 'पातशाही अमील येत होता तो जमीदाराचें विद्यमानें पैसा घेत होता.' ह्यांतील जमीदार म्हणजे वर म्हटल्याप्रमाणें देशमूखच होत. व त्यांचेच हस्तें रयतेकरवीं पैसा घ्यावयाचा. अफझलखान देशमुखींचें काम असें सांगतो.—

'देशमुखचे काइदा आहे की विलायती फिरोन एक तसू पडू नेदीता जे पडी जमीन पडले आसेल त्यास नांगरचे व इस्तावेचे कौलबोल देवाऊनु तमाम जमीन कीर्दी करावे; साल बसाल दुस्त चढत आसावे, हे तुमचे रवेश आहे.'

(इ. १६५६ आक्टो. १८—शि. च. सा. १ ले. ४५)

मसूर परगण्याचे देशमूख जगदळे ह्यांस असेंच सांगितलें आहे. खं. १५ ले.६० श. १६३३ इ. १७११.

'तुम्ही परगणे मजकूरच्या मोकदमांस व कसबे मजकूरच्या सेटे महाजनांस कौल देऊन आबादी व इस्तमालतीस (लावणी संचणीस) कोसीस करुन किफायत सरकार व रफायत राया अमलांत आणोन व हरएक असामीस तुम्ही आपला कौल देऊन आणाल त्याप्रमाणें चालविलें जाईल. सरकारचें काम बवजे अहसन सरंजाम करीत जाणें.'

श्रीशिवरायाचे वेळींहि देशमुखांचें काम सांगतांना "गांवचा गांव फिरोन ऐसे करणें कीं अमका गाव त्यासी रकम अमकी, त्याची जमीन अमकी, त्यासी अवल दूमसीम ऐसी जाती निवडोन, कस्त केलियानें काय पिकेल ते चौकस करून...आकार करणें. (ह्या) अखेर कामास ब्राह्मण अगर परभू (प्रभु) कारकून ठेवावा तर तो गैरआरामी आणि त्याणे काय करावे, जमिनीचे पोटफोडी गावी पीक काय, काय धारा, हे त्या गरिबास (काय माहीत...) तुमचे महालीचा मक्तेदार तुम्ही;" असेंच सांगितलें आहे. खं. १५ पृ. ३६९–७०.

असे आणखींहि देशमुखांचीं कामें सांगणारे उतारे पुष्कळ देतां येतील. पण तितक्यांचें कारण नाहीं. कां कीं, त्या सर्वांमधून हेंच एक मुख्य काम देशमुखांचें दिसून येणार आहे. रयतेची भरभराट व सरकारची किफायत ज्यामुळें वर्षानुवर्ष चालेल, बढती होऊन चालेल, तें काम देशमुखांचें. फिरते व ठरते आणि रोजचे व आठवड्याचे किंवा यात्रादि प्रसंगाचे नैमित्तिक असे बाजारहाट; पांढरींतील इतर उद्योगधंदे साळी, कोष्टी, धनगर, चांभार, सोनार, तेली, बुरुड हे, तसेच फिरत्या जमातीचे धंदे म्हणजे शिकलगार, धांवा बसविणें, लोहार, घिसाडी, धावड इ. इ. कामगारांचीं पालें; आणि मुख्यतः परगण्याखालील शेतीची सर्व भूमि लागवडीस आणणें; परगणा संपन्न राखणें हें कार्य देशमूख–देशपांडे यांचें आहे. वरील उताऱ्यांत अफजलखान म्हणतो 'मी मोकासदार झाल्यापासून थोडासुद्धां अन्य वावगा उपसर्ग रयतेस वा तुम्हांस लागला

नसतां म्हणजे यत्किंचितहि तक्रारीस जागा नसतां शिरवळ परगण्यांतील सर्व पिकाऊ जमीनींत बीपेरणी नाहीं किंवा पड पडलेली जमीन नवीन लागवडीस आणलेली नाहीं असें कां ? परगण्यांतील अशा जमीनीपैकीं एक तसूसुद्धां जमीन बिनशेतीची राहतां कामा नये; सर्वच्या सर्व जमीन लागवडीस येण्यासाठीं गांवन् गांव तुम्ही देशमुख देशपांड्यानीं सारखे फिरते राहून, रयतेस उत्तेजित करून, कोणास काय पाहिजे तें देऊन जमीन पिकाऊ केलीच पाहिजे. ते न करतां तुम्ही बाहेर हिंडतां मग देशमुखी कसली करतां व देशमुखीचा हक्क आणि मानपान कसचा उपभोगितां ? पड जमीन लागवडीस आणण्यासाठीं शेतकऱ्यांना पहिले वर्षी कांहीं खंड आकारूं नये; दुसऱ्या वर्षापासून पिकाच्या व शेतकऱ्यानें केलेल्या कष्टाच्या मानानें थोडा खंड आकरावा; त्याच्या पुढल्या वर्षी आणखी थोडा खंड अधिक आकारावा; असें थोडें थोडें वाढवीत म्हणजे रयतेची भरभराट करीत सरकारचाहि फायदा करीत मुलूख आबाद राखावयाचा. दुसऱ्या उताऱ्यांत ह्या शेत लागवडीच्या कामाशिवाय बाजारहाट व इतर उद्योगधंदे चालू रहावेत व त्यांतहि म्हणजे व्यापारधंद्यांतहि भरभराट होऊन त्यापासूनहि सरकारची किफायत अधिकाधिक होऊं लागेल असें करावें व त्यासाठींहि वाणी-बकालांना सुरक्षिततेचें आश्वासन द्यावें असें सांगितलें आहे. तात्पर्य, देशमुखानें आपापल्या प्रांतांतील सर्व प्रजा उद्योगी कशी राहील व सर्व प्रकारचें उत्पन्न कसें वाढेल ह्याची चिंता वाहिली पाहिजे. त्यासाठीं त्यानें आपल्या हाताखालीं निरनिराळे अधिकारी नेमून घ्यावे, प्रांतभर सदोदित फिरते राहावे, पदरीं चाकरप्यादे ठेऊन प्रसंगीं थोडे सैन्य ठेवावें आणि ही देशमुखी सत्ता चालवावी.

ह्या सर्व विवेचनावरून हें आतां लक्ष्यांत येईल कीं देशमूख हा एक मांडलीक राजा, देशनायकच आहे. त्याच्याकडील कामाकरतां त्याच्या पदरीं राजाप्रमाणें पेशवा म्हणून एक अधिकारी असे. देशमुखाला स्वतंत्र मुद्रा आहे. प्रांतांतील सर्व दप्तर त्याच्या मुद्रेशिवाय प्रमाण नाहीं. वार्षिक जमाबंदी, कोणच्या गांवच्या शेतीवर किती आकार घ्यावयाचा, बाजारच्या व्यापारी कुळाकडूनहि किती प्रमाणांत वसूल घ्यावयाचा इत्यादि सर्व ठराव देशमुखाच्या सल्ल्यानेंच सरकारी मुजुमदार व सुभेदार ह्यांनीं निश्चित करावयाचे. परगण्यांतील सर्व प्रकारचे तंटेबखेडे देशमुखांनीं मिटवावयाचे. गांवाच्या सीमा ठरविणें, गांवशिवारांतील बांद कायम राखणें, पिकांवर, गुराढोरांवर आणि रयतेवर सरकारी किंवा सावकारी जुलूम होऊं न देणें, नवीन वसाहात करणें, परगण्यांत कोणाला इनाम देणें, कोणाला मिरासी हक्क देणें इत्यादि इत्यादि राजाप्रमाणें सर्व व्यवहार आपल्या दृष्टीखालीं जो चालू ठेवतो त्यास अमात्यांनीं 'तो स्वतंत्र देशनायकच आहे, राज्याचे दायाद म्हणजे राज्याचा भागीदारच दुसरा राजाच आहे ' असें म्हटलें तें अगदीं योग्य.

चें, हें देशव्यवस्थेचें काम कोणी तरी जबाबदारानें केलें पाहिजेच. मुख्य जो खरा राजसत्ताधारी त्यास ह्या कामाची आवश्यकता आहेच. ह्या व्यवस्थेशिवाय तो राजा तरी राज्य करणार म्हणजे काय करणार? तर राजकर्तव्यांतील मुख्यच काम हें आहे व तें हे देशमूख करणार. अशी जर ह्या देशमुखांची अत्यंत आवश्यकता आहे तर त्याविरुद्ध अमात्य आपल्या राजनीतींत इतके कठोरपणें कां लिहितात; सभासदहि शिवाजीचें धोरण म्हणून ह्या देशमुखांच्या विरुद्धच लिहितात तें कां? आणि देशमुखादि वतनदार नष्ट करण्याकडे शिवाजीचें जें धोरण होतें त्याचेंच समर्थन तरी कां केलें जातें?

ह्या प्रश्नाचें उत्तर देण्याच्या आधीं हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, शिवाजी किंवा राजनीतिकार हे देशमुखीच्या विरुद्ध नाहींत. देशमुखांच्या विरुद्ध आहेत. म्हणजे देशमूख जी आपापल्या देशांतील सुव्यवस्था राखणार ती अवश्यच व्हावयास पाहिजे; पण ती व्यवस्था जेव्हां परकीय राजसत्तेचा आधार म्हणून चालू राहते तेव्हां त्या व्यवस्थेपेक्षां त्या व्यवस्थेचे चालक हे अडथळा म्हणून वाटूं लागतात व तें अगदीं साहजिक आहे. येथूनच ह्या प्रकरणास राज्यकारभारांतील ती एक बाब म्हणून प्रारंभ होतो व प्रारंभीं देशव्यवस्था व राज्यकारभार ह्यांची गुंतागुंन आहे असें जें म्हटलें तें आतां लक्ष्यांत येणें सोपें होईल.

८ देशव्यवस्था आणि राज्यकारभार ह्यांत वस्तुतः विरोध किंवा गुंतागुंत असण्याचें कांहींच कारण नाहीं. सुराज्याशीं स्वराज्याचें कांहीं भांडण नाहीं. पण सत्ता बदल जेव्हां होतो तेव्हां ह्या विरोधाचें रूप प्रथम प्रगट होतें आणि तेथेंच काय तो खरा विरोधाचा उगम सांपडतो. देशमुखीविरुद्ध नव्हे, देशमुखांच्या विरुद्ध शिवाजीराजे आहेत म्हणजे काय किंवा देशव्यवस्था व राज्यकारभार ह्यांत अडथळा वाटेल अशी गुंतागुंत कशी ह्यासंबंधींचें विवेचन करणें हें तत्कालीन राजकारणाचेंच विवेचन करणारें होणार आहे. ह्या व्यवस्थेची ओळख करून घेत असतां त्या राजकारणाच्याहि दोन गोष्टी प्रसंगानें करूं. पण, प्रस्तुत आपणांस देशमुखां करवीं होत असलेल्या देशव्यवस्थेचें रूप पाहावयाचें आहे. म्हणून देशमुखी संस्था व तिच्या करवीं होणारा देशव्यवस्थेचा कारभार हें आपणांस मुख्यतः पाहावयाचें आहे.

९ देशमुखी संस्थेसंबंधीं विचार करीत असतां त्या संस्थेच्या म्हणजे देशमुखांच्या अधिकारदर्शक मुद्रेसंबंधीं थोडा विचार करणें युक्त आहे. पहिली गोष्ट ह्या बाबतींत ही कीं, परगणे वतनदारांतील देशपांडे–देशकुलकर्णी, कर्नाटकाकडील नाडकर्णी, देशचौगुला ह्या अधिकाऱ्यांपैकीं देशमुखानांच[1] फक्त मुद्राधिकार आहे व ह्यावरूनहि वतनदारांतील देशमुख हीच वरची

---

१ पाटील व देशकुलकर्णी ह्यांची एक मुद्रा १८३६ इ. वृ. पृ. ७०; खंड १५ पृ. ६०–६१ वर आली आहे. पण हा अपवाद आहे, नियम नाहीं.

श्रेणी होय हें सहज कळून येतें. देशमुखांच्या मुद्रेचा म्हणजे शिक्याचा विचार करतांना ( १ ) मुद्रा ज्या पत्रावर उठविली असेल त्या पत्राच्या प्रारंभींचा आणि मुद्रेंतील नावाशीं संबद्ध असलेला मायना व ( २ ) मुद्रा महजरपत्रावर म्हणजे निर्णय देणाऱ्या सभेच्या पत्रावर असल्यास त्या मुद्रेच्या वर अथवा बाजूस मुद्राधिकाऱ्याच्या नांवाचा उल्लेख केलेला असतो तो, ह्या दोन गोष्टी लक्ष्यांत घेऊनच केला पाहिजे. नुसत्या मुद्रेवरून म्हणजे मुद्रेंतील मजकुरावरून विचार करणें अपुरें व निरुपयोगी होण्याचा हटकून संभव. कोणत्याहि ऐतिहासिक मुद्रेविषयीं विचार करतांना हाच नियम लागूं केला पाहिजे. असो. ह्या दोन गोष्टी आणि मुद्रा लक्ष्यांत घेतां पुढील वैशिष्ट्य ध्यानीं येतें. देशमूख हे राजसत्तेच्या आश्रयावर व सुभेदाराच्या जोडीला राहून आपलें वसुली काम करणारे असले तरी त्या राजसत्तेचे ते सेवक नाहींत. एकाहि देसाई–देशमुखाच्या शिक्क्यांत ' शिवचरणीं तत्पर,' ' शाहूचरणीं तत्पर किंवा 'बन्दे निजामशाही, 'आदिलशाही' अथवा 'शहा, सुलतान ह्यांचा' निर्देश नाहीं. तसेंच त्यांच्या पत्राचा प्रारंभ ' अज सुभा, अज दिवाण, अज ठाणा' असा नसतो. असा आरंभ असून जर कोणाचा शिक्का विना–हुद्दा असला तर ती व्यक्ति सरकार–नियोजित नोकर होय असें समजलें पाहिजे. तर असा प्रारंभ नाहीं हें एक, आणि शिक्यांत नांगर असतो हें दुसरें, हीं दोन्हीं लक्षणें विचारांत घेतलीं म्हणजे देशमूख ह्या संस्थेचें राज्यकारभारांतील मुख्य कार्य कोणचें हें सहज कळून येतें. आज नांगरहाक्या, नांगऱ्या, निशाणी नांगर हीं दुर्विशेषणें झालीं आहेत. पण हा बदलल्या कालाचा परिणाम आहे. नांगर, ही वस्तु एका काळीं नामांकित, सर्वजनप्रसिद्ध अशी थोर मानाची होती. काळीपेक्षां पांढर बळावली, म्हणजे काळींतील वस्तूंना व कार्यकर्त्यांना सापेक्षतेनें कमी लेखलें जातें, त्यांतीलच हा प्रकार आहे. पण आपण ज्या काळांतील चालीरीतींची ओळख करून घेत आहों त्या कालांत नांगर ही वस्तु देशमुखांच्या मुद्रेंत म्हणजे अभिलषित अशा भूषणभूत वस्तूंत गणली जात होती. अमुक नांगर जमीन हें एक + जमीनीचें माप त्यावेळीं होतें. पदरीं नांगर असणें म्हणजे नांगर चालविणाऱ्या धुरीच्या दोन बैलांसह इतर दहा बैल असणें, ही गोष्ट तेव्हां श्रीमंतीची निदर्शक होती. नांगरास लागणाऱ्या बारा बैलांत धुरीचे बैलाच्या जोडीचा हा विशेष आवर्जुन लक्ष्यांत आणला पाहिजे. लहान नांगर म्हणजे नांगरी असेल तर बारापेक्षां कमी म्हणजे ६,८,१० असे बैल लागतील. पण त्यांतहि धुरीच्या बैलांची महती आहेच. असो. असा हा नांगर ज्यांची निशाणी म्हणजे व्यवसायाचें प्रतीक आहे त्यांचें मुख्य काम तेंच; सर्व भूमी लागवडीस आणून देशवसाहाती करून सर्व प्रकारें जनतेची भरभराट करणे हें व ह्या कामास नांगर हेंच प्रमुख साधन आहे.

---

+ सनदा पत्रें ले. ४ पृ. ९

जमीन वहितीला आणण्यासाठी मुजेरी, किंवा प्रज म्हणजे शेत कसणारे आणले, तरी त्यांना नांगर व बैल देऊन कीर्दीला प्रारंभ करविणें हें पाटील–देशमुखांचें काम असे. म्हणून नांगर ही निशाणी ह्या दोघांची आहे. त्यांत श्रेष्ठ म्हणून देशमुखांना मुद्रेचा अधिकार आहे व तींत नांगरचिन्ह असावयाचें आणि पाटिलांच्या नामनिर्देशापुढें हातानें नांगर चिन्ह काढावयाचें. येथेंच हेंहि सांगितलें पाहिजे कीं, ज्याचे नांवापुढें नांगर ही निशाणी असते त्यास लिहितां येत नाहीं, निशाणी नांगर म्हणजे निरक्षर व्यक्ति असा अर्थ नाहीं. तर त्याच्या व्यवसायाचें हें चिन्ह दाखवावयाचें इतकाच त्यांत हेतु आहे. कारण लेखन ज्या वर्गांत, ज्या समाजांत आहे त्यांतहि निशाणी नांगराचे धनी आहेत, ब्राह्मणापैकीं पाटील देशमूख आहेत. पण ह्या अधिकारानें जेव्हां कागदपत्रांत त्यांचा संबंध येतो तेव्हां त्यांच्या नांवापुढें नांगर काढलेला असतोच. शिवाय पाटीलदेशमुखादि मराठा मंडळींतहि साक्षर व लेखक, वाचक आहेत.

देशमुखांच्या शिक्याचें ( १ ) देशमुखाचें नांव व ( २ ) देसाई, देशमुख हा अधिकार, ( ३ ) कोठल्या परगण्याची ही देशमुखी त्या पगण्याचा उल्लेख आणि त्यांचें ( ४ ) कार्यदर्शक नांगर चिन्ह असें चतुर्लक्षणयुक्त रूप असतें. नांगर हा देशमुखांच्या शिक्क्यांत असावयाचाच ह्या नियमाची सिद्धि ऐ. सं. सा. खं. १ ले. ७० मधील उल्लेखावरून पुढीलप्रमाणें साधार सांगतां येतें. सासवडच्या जगताप देशमुखांमधील शिक्क्याचा धनी असलेला देशमूख गत झाला. तेव्हां त्याची बायको देशमुखीचा शिक्का घेऊन माहेरीं गेली. पुढें भांडणावर प्रकरण येऊन शिक्का नवाच करावा लागला. तेव्हां ‘ सिका नवा कोरून त्यांत नांगर ’ काढल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. व त्याप्रमाणें फलटण, कुडाळ, चाकण, कासेगांव, सुपें, वांई, कर्यात मावळ, वणी, राजूर, ह्या ठिकाणच्या निंबाळकर, शिंदे, कडू, पिसाळ, पायगुडे, छत्रपतीशाहू राजे भोसले इ. ह्या देशमुखमंडळींच्या मुद्रेंत नांगर कोरलेला आहे. ह्यांचा आकार चौकोनी, अष्टकोनी, वर्तुळी, लंब चौकोन, इ. विविध प्रकारचा आहे. एक शिक्का तर प्रत्यक्ष नांगराच्याच आकाराचा कोरून त्यांत देशमुखाचें नांव दाखविलें आहे. ह्यांतील कांहीं देशमुखांच्या शिक्यासंबंधानें थोडी स्पष्टता करण्याजोगी आहे. फलटणकर निंबाळकर देशमुखांस नाईक ही पदवी आहे. ह्यांचे पैकीं कांहीं शिक्यांत नांगर नाहीं. व त्याचें कारण हें कीं हा परगणा त्यांजकडे मोकासा म्हणजे जहागीर म्हणून होता. व पुढें त्याची देशमुखी निंबाळकरांस मिळाली. शि. च. सा. खं. ४ ले. ७० पहा. सुप्याचे देशमूख सर्फराजखान हे मुसलमान असून त्यांचेंहि शिक्यांत नांगर आहे. कुडाळकर देशमुखांच्या शिक्यांत नांगराबरोबर चंद्र, सूर्य कोरले आहेत.

वांई व कऱ्हाड परगण्याच्या देशमुखीसंबंधानें तर बरेंच उद्बोधक व स्वतंत्रपणें सांगण्याजोगें आहे. वांई देशमुखीचे तीन शिक्के प्रसिद्ध आहेत.

दत्ताजी व सूर्याजी पिसाळ आणि शाहू छत्रपती भोसले राजेपैकीं सूर्याजी पिसाळाच्या देशमुखी शिक्यांत त्या घराण्याच्या दैवताचा–पद्मावती देवीचा–निर्देश आहे. आणि शाहू छत्रपतींच्या देशमुखी शिक्यांत नांगर कोरलेला आहे. कांहीं देशमुखांचे शिक्के फारसी आहेत व हे देशमूख मराठे क्षत्रिय आहेत. वर सुप्याचे देशमूख मुसलमान असून शिक्का मराठी बालबोध असल्याचें सांगितलेंच आहे. सिंदखेडचे जाधव देशमूख, खटाव–फडतरे देशमुख, निंबसोड माइणींचे घारगेदेशमुख ह्यांचा शिक्का फारसींत आहे. कऱ्हाड (यादव), सिरवळ (निगडे), सुपे (दुसरे-कांटे), मलवडी (घाटगे), मसूर (जगदळे) इत्यादि देशमुखांच्या प्रसिद्ध शिक्यांत नांगर चिन्ह नाहीं. व त्याचें कारण साधार असें आज सांगतां येत नाहीं. पण त्यामुळें वरील विधानास व विवेचनास बाध येत नाहीं. शिवाय येथें हीहि गोष्ट सांगितली पाहिजे कीं, मूळ अस्सल कागदांच्या नकला यथातथ्य करणें व त्या यथामूल छापल्या जाणें ह्या गोष्टी मुद्रित पत्राच्या बाबतींत सर्वदांच दक्षतापूर्वक व सर्व सोयीस्कर व्यवस्था होऊन झालेल्या नाहींत. नकला करतांना शिक्यांचा आकार, आंतील मजकुराच्या ओळी, चिन्हें, वलयें इ. बारीक लक्ष पुरवून शिक्के नकलून घेणें घडलें नाहीं व केव्हां घडलें तरी छापखान्यांत त्याच्या प्रकाशनाची सर्व साधनसामग्री असून तें तसेंच मुद्रित होणें घडलेलें नाहीं. आज ज्या गोष्टींना महत्त्व देऊन आपण त्याचा विचार करतो, त्यांचा तेव्हां तसा महत्त्वाचा भाग लक्ष्यांत येऊन प्रत्येक बारीक गोष्ट अगदीं यथामूल प्रकाशित झाली आहे असें नाहीं व हें साहजिक आहे. तात्पर्य, ह्या बाबतींत मूळ अस्सल पत्रें पुन्हा पाहून त्यांवरून वरील व पुढील विवेचनांत भर वा दुरुस्तीस अवकाश आहे. असो. ह्या देशमुखीच्या शिक्याचा मोठा मान आहे. त्यासाठीं अनेक भांडणें झालेलीं आहेत व त्यांत गांवें विभागून घेऊन शिक्याचा मान तेवढ्या भागापुरता घेतला गेला आहे. अशा वेळीं त्या देशमुखींत तीन शिक्के झाले आहेत आणि ह्या सर्व गांवांचा एका कागदांत संबंध येऊन उल्लेख होत असेल तर तिन्ही शिक्के एकाच कागदावर उठविलेले आहेत. राजवाडे खं. १५ ले. ६४ पृ. १२९ वर कुडाळ देशमुखांत तिघा भावांचे तीन देशमुखीचे शिक्के आहेत. तसेंच कांहीं देशमुखांच्या शिक्यांत राहत्या गांवाचा त्याच ग्रामनांवानें परगणा ओळखला जात असल्यामुळें मौजे असें विशेषण देऊन निर्देश केला आहे. कदाचित् ह्या एका गांवापुरतीच देशमुखी असल्यास असा उल्लेख असेल. ह्याच कागदावर (खं. १५ ले. ४५१) परगण्याचे देशमूख म्हणून ह्याच व्यक्तीचा निर्देश आला आहे. व त्या उल्लेखाबरोबर ज्या दुसऱ्या देशमुखव्यक्तीचें नांव आलें आहे तें ले. ४४५ (कित्ता) वरील शिक्यावरून परगणे चाकण अशा उल्लेखाचें असल्यामुळें ले. ४५१ मधील देशमुखीचा चाकण हा एकच गांव त्याकडे आणि तो ले. ४५५ मधील सर्व चाकण परगण्यांचा देशमूख म्हणणें इष्ट होईल. ह्या शिक्याची जपणूकहि तशीच काळजीनें

करीत. प्रसंगीं हा शिक्का [1]गळ्यांत एखाद्या अलंकाराप्रमाणें धारण करीत. ह्या मुद्रेच्या स्वरूपाची कल्पना द्यावयाची तर वर निमुळतें व खालीं रुंद होत गेलेली गोल व सामान्यतः टीचीपेक्षां कधींच लांब नसलेली अशी चिलमीप्रमाणें मूठ असलेली ही मुद्रा असते. त्यामधील अक्षरें उलट सुलट कळून येण्याकरतां खुणेची टिकलीहि एका अंगास असते. मुठीमध्यें कित्येक वेळा नक्षीकाम केलेलें व ती सामान्यतः चांदीची असते. सोन्याच्या मुठीच्याहि मुद्रा आहेत. पण त्यांत देशमुखांच्या असल्याचें आढळलें नाहीं. ह्या मुद्रेच्या महत्वकथनांत पुढील गोष्टी उल्लेखनीय आहेत. मुद्राधिकारी किंवा 'शिक्केकरी' हा त्या घराण्यांतील प्रमुख व देशमूख म्हणून लोकदरबारांतील वा राजदरबारांतील खरा मानकरी. परगण्यासंबंधींचीं जमाबंदी प्रकरणींचीं सर्व खतेंपत्रें, परगण्यांतील गोतमहजर, परगणेवतनदारांचे पण परस्थळीं जाऊन केलेले आणि दुसऱ्या परगण्यांतील ह्या परगण्यांत येऊन झालेले महजर व न्यायनिवाडपत्रें इत्यादि कागदांवर देशमूखदेशपांड्यांचे शिक्के व दस्कत असल्याशिवाय ते कागद प्रमाण आणि विश्वसनीय नव्हत. देशमुखच्या उत्पन्नांत शिक्क्यासाठीं स्वतंत्र एक गांव मानाचा असे. कागदावर देशमुखाचा शिक्का व्हावयाचा म्हणजे त्यासहि कांहीं देकार होई. तात्पर्य, शिक्का ही जशी मानाची बाब तशी उत्पन्नाचीहि बाब असे. वतनपत्रें पृ. ८-११ मधील तंटा शिक्क्यासंबंधीचाच असून एक हजार रुपये ज्याच्याकडे वडीलकी व शिक्याचें उत्पन्न आलें, त्यानें, सरकारांत जिल्हेकडे म्हणजे सचिवांकडे ते भरले आहेत. शिक्याकरतां स्वतंत्र वाटा, शिक्याकरतां स्वतंत्र चाकर लोक व राबते महार आहेत. तेथील शिक्केकरी हा शब्द वडीलकी व मुख्य देशमूख ह्याचें उपलक्षणात्मक आहे. देशमुखींतील शिक्का आपल्याकडे असणें, ही बाब किती महत्वाची असे ह्याचें आणखी एक उदाहरण देऊन हें मुद्राप्रकरण संपवूं. बाजी पासलकर देशमूख मुसेखोरेकर ह्याला शिवाजीराजानें बेलसरच्या लढाईवर जाण्यास सांगितलें. तेव्हां पासलकरानें शिवाजीस म्हटलें, 'साहेबकामावरी सेवक जावयास मागे सरतो ऐसे नाहीं; परंतु बाळाजीचा व माझा देशमुखीचा निवाडा जाला नाहीं इतका हेत माझा राहतो' तेव्हां शिवाजीनें उत्तर दिलें 'सांप्रत तुम्ही मोहिमेस जाणें तुमचा शिका मजपाशीं आहे. फत्ते करून सुरक्षित आल्यावरी तो तुम्हांस बाळाजीपासून घेऊन बहाल केला जाईल. साहेब कामावरी तुम्ही खर्च जाला तर सिका तुमचे गोरीवर ठेवूं' पुढें बाजी यशवंतराव पासलकर (यशवतराव हा किताब आहे.) हा त्या युद्धांत वीरस्वर्ग पावला. तेव्हां बाजीचा मुलगा कृष्णाजी यास 'बाजी' हाच किताब देऊन 'सवाई बाजी' नांव ठेविलें व देशमुखीचा शिक्काहि दिला.

---

१ ऐ. सं. सा. खं. १ ले. १६ पृ. १७ पायगुडे देशमूख हकीकत.

अशी ही देशमुखीच्या शिक्याची महत्वाची बाब आहे.

आतांपर्यंत १ देशमूख व तत्सम संज्ञा, २ देशमुखींचें व्यतिरेकानें महत्त्व, ३ छत्रपतींनाहि देशमुखपदाची हांव, ४ देशमूख हे शाश्वत अधिकारी, ५ देशमुखी भूगोल भिन्न, प्रमाण व पूर्ण, ६ देशमुखीचें अन्वयरूपानें महत्त्व, ७ देशमुखी वतनाचीं कामें, देशमुख हा स्वतंत्र देशनायक, ८ देशव्यवस्था व राज्यकारभार; देशमुखीच्या विरुद्ध शिवाजीराजे नाहींत, ९ देशमुखीची मुद्रा; इतक्या मुद्यांसंबंधानें कांहीं प्रतिपादन केलें. शेवटीं देशमुखीच्या उत्पत्तिसंबंधानें थोडक्यांत लिहून हा निबंध येथें पुरा करूं-

देशमुख हे जर शाश्वत व कुलागत अधिकारी, त्यांचें मुख्य काम जर देश-वसाहतीचें व लावणीचें, तर ह्या संस्थेची म्हणजे देशमुखीची निर्मिति प्राचीन आहे, मुसलमान–पूर्वकालीन आहे; असेंच मानणें सहज प्राप्त आहे. येथें मानणें असा शब्द घातला ह्याचा अर्थ इतकाच कीं, प्रत्यक्ष उल्लेख तितके जुने मिळत नाहींत. मिळतात ते अलीकडील व मुसलमानराजवटींतील. पण हे उल्लेख बलिष्ट असलेल्या राजसत्ते-चीही मान्यता आपणास आहे, हें दाखविणारे आहेत. एवढ्यावरून देशमुखीची निर्मिती मुसलमानी अमदानींतील होय, असें समजणें सयुक्तिक होणार नाहीं. ह्याविषयीं किंचित् विस्तारपूर्वक व स्वतंत्र लिहिणें आवश्यक आहे.

ह्यानंतर देशमुखीचे मान कोणकोणते, देशमुखीचें उत्पन्न कसें व किती, देशमुखी कचेरींतील म्हणजे देशमुखांचे पदरचे अधिकारी कोणकोण व त्यांचीं कामें काय, देशमुखींतील अधिकांत अधिक मुलूख केवढा इत्यादिविषयीं माहिती द्यावयाची; पण झाला हाच लेख मोठा झाला म्हणून तूर्त येथें थांबणें इष्ट आहे. ही माहिती दिल्यावर राजकीय म्हणून जी देशमुखीची बाब ती स्वतंत्रच द्यावयास पाहिजे. देशमुखांच्या विरुद्ध शिवाजी होता तो कां ? छत्रपती आपल्या राज्यासच ‘ हें वतनी राज्य ’ असा शब्द योजतात तो कां, प्रत्यक्ष मुलूख वसाहतीचे कांहीं नियम; देशमुख मंडळींनीं केलेलीं राजकीय कामें इ. इ. गोष्टी लिहावयाच्या आहेत. त्या आणखी एखादे वेळीं मांडूं.

---

## ६ इंग्रजी

## 20 Samudra-Saṅgama, a Philosophical Work by Dara-Shukoh, Son of Shah Jahan Composed in A. D. 1655.

BY P. K. GODE.

Beale in his *Oriental Biographical Dictionary*[1] states that Dara Shukoh was the author of "a work entitled *Majma '-ul-Bahrain* (i. e. the *uniting of both Seas*) in which he endeavours to reconcile the Brāhmaṇ religion with Muhammadan, citing passages from the Qurān to prove the several points. In 1656 he likewise with the same intent caused a Persian translation to be made by the Brāhmaṇs of Banāras of the Anikhat a work in the Sanskrit language etc."

In Aufrecht's *Catalogous Catalogorum* there is only one MS. recorded of a work called *Samudra-Saṅgama*[2] which is identical with MS. *No. 1043 of 1891-95* in the

---

1. New Edition, London, 1894, p. 117—article on *Dara Shukoh*. The Chronology of Dara's life as found in this article is as follows :—

Dara, born--*20th March 1615* (29th Safar, A. H. *1024*).

His marriage—*A. D. 1633* (A. H. *1043*)

Battle between Dara and Aurangzeb—*A. D. 1658*.

Dara, murdered by order of Aurangzeb--*29th August 1659* (21st Zil-hijja A. H. *1069*).

Dara caused the Upanishads to be translated by Benares Pandits—*A. D. 1656*.

2. A work of this name is recorded by Poleman in his list of *Indic MSS in U. S. A.* (1938) as follows:—

*Page 277*--MS. No. 5463 समुद्रसंगम (by विज्ञापन?) Cosmology, 44 ff. 8·25 × 4·75 (Harward 1212).

Perhaps this is identical with Dārā's work समद्रसंगम.

Govt. MSS. Library at the B. O. R. Institute, Poona. The title "*Samudra-Saṅgama*" corresponds to the "*uniting of both Seas*" or *Majma '-ul-Bahrain* referred to above. Most probably the *Samudra-Saṅgama* is a Sanskrit adaptation of the Persian work of a similar title mentioned by Beale.

Prof. Kathawate who acquired the MS. of the *Samudra-Saṅgama* for the Govt. of Bombay in 1891 has described its contents in detail in his *Report*[1] *for 1891-95* and hence I need not deal with them in this paper. I shall only discuss here the date of composition of the work in question as recorded in our MS. *No. 1043 of 1891-95* which begins as follows :—

" ॥ सर्वत्र प्रकटः स सर्वावभासः स आदिः सोंतस्तदतिरिक्तं वस्तु नास्तीति प्रतिवेशी सवासी च सहगः सर्वमेव सः पटच्चरे दरिद्रस्य क्षौमे राज्ञः सर्वतः भाति संसदि-भेदोयमभेदो रहसिस्फुटः ईशस्य शयनं भूयः त छपः सर्वमेव सः प्रणामानामानंत्यं परम-प्रकाशप्रकाशके जगत्सृष्टिनिमित्तेस्माकं सिद्धानां सिद्धे परमेश्वरेण सत्कृते सन्मानिते च तथा पवित्रतमे तत्परिवारे महत्तरे तत्प्रतिनिधिरूपे च अथ कथयति वीतराग विगतशोक संदोह **महम्मद दाराशुकोह** ॥ एवं यद्विज्ञाय सकलतत्त्वतत्त्वं निर्णाय च सत्यैकात्मवादतात्पर्यं आसाद्य " etc.

It appears from the above passage that महम्मद दाराशुको who is described by the adjectives "वीतराग", "विगतशोकसंदेह" is the author of the present work. One बाबालाल is mentioned in line 6 on folio 1b of the MS. He appears to be some contemporary mystic and perhaps a guru[2] of Dara

---

1. Published at Bombay, 1901, Pages 18-20.

2. On *folio* 7a Dara refers to some Muslim Saints and divines as follows :—

"परमसिद्धानुसारिणः ते च ईश्वरसत्कृतपरमसिद्धसमयवार्तिनः सिद्धास्तत्परिवारभूतास्त-त्प्रतिनिधिभूताश्च । अबूबकर उम्मर उस्मान् अली हसन् हुसैन् अन्यस्मिन्समये च एतादृशा ज़ुन्नूनमिसीरी ज़ुनेदोज्ञानिनां गुरुः मीरान् मुहद्दीन् इब्न अरबी **मद्गुरुः मियां मीर मुल्लाशाह मियांवारी** ॥ "

( *Continued on the next page* )

Shukoh as he is reverently mentioned as "चैतन्यस्वरूप ज्ञानमूर्त्ति सद्गुरु. The author explains why the title समुद्रसंगम is given to this work :—

"अवश्यं ज्ञातव्यानां सफलानां कतिपयवाक्यानां सारस्य संग्रहमकरवं ज्ञानिनोर्द्वयोरपि **मतसमुद्रयोरिह संगम** इति नाम चास्थापयं **समुद्रसंगम** इत्थं किलोपदेशो महानुभावानां यन्निर्मत्सरतया तत्त्वविवेचनं" etc.

The MS ends as follows on folio 11a:—

"वेदसमुद्रं मथित्वा ज्ञानरत्नमेकमीदृशं निष्कासितं यद्देवैर्दैत्यैश्च समुद्रमथनं कृत्वा निष्काशितेषु चतुर्दशरत्नेष्वपि न प्राप्तं। आराधना परमेश्वरस्य विज्ञापना च या कृता तया **समुद्रसंगम**समाप्तौ सामर्थ्यं प्राप्तं। **सहस्रोत्तर पंचषष्टितमे संवत्सरे**-स्मत्परमशकाब्यतीते **द्विचत्वारिंशत्तमे** च संवत्सरेऽस्य **वीतराग**स्याप्यायुषो

( *Continued from the last page* )

अबूबकर --The first orthodox Caliph (632 A. D.)

उम्मर—The second orthodox Caliph (634 A. D.)

उस्मान्--The third orthodox Caliph (644 A. D.)

अली—The fourth orthodox Caliph (656 A. D.)

हसन्--eldest son of अली and grandson of Prophet Mahomet, born in 3 A. H.

हुसेन्--Second son of अली born in 4 A. H.

मियां मीर--Born A. H. 938. Died 1045 A. H.-frequently visited by Shah Jahan and Dara Shukoh.

मुल्लाशाह—Came to Lahore in A. D. 1614 and became disciple of मियां मीर—Died in A. H. 1661. Highly respected by दारा.

मुइद्दीन इब्न अरबी—The greatest mystic (A. D. *1165–1240.*)

I have taken the above notes from Prof. Haq's remarks (pp. 57–63) on the Muslim Saints and Divines referred to by Dārā. Khan Bahadur Prof. A. K. Shaikh was kind enough to send me an English Trans. of Dārā's *Risala-i-haq-numa* (Compass of Truth) by S. C. Basu, Panini Office, Allahabad, 1912. Dārā composed this work in A. H. *1055–56*. In the extract from Dārā's *Saflnat-ul-auliya* (A. H. 1049) given by Basu in his Trans. I find one Hazrat Sheikh-*Zun-nun Misary* quoted on page V. He seems to be identical with "जून्नुन मिसीरी" mentioned in the above quoted extract from समुद्रसंगम.

विद्यमाने परमेश्वरेण सत्करणीयः स्वजनश्रेष्ठतमोस्मत्परमासिद्धः सपरिवारप्रतिनिधिसमूहः[1] ॥ ॥ इति श्री**समुद्रसंगम**नामाग्रंथः परिपूर्णतामगमत् ॥ शुभं भवतु लेखक-पाठकयोः ॥ श्रीः ॥ संवत् १७६५ वर्षे मार्गशिर वदि सप्तम्यां चंद्रजवारे ॥ श्रीः ॥

The above extract gives us the following information:-

(1) The work was completed when 1065 th year of our era (A. H.) had passed away and when

(2) the Author (वीतराग महम्मद दाराशुको) was running the 42nd year of his life.

(3) The present MS. was completed in Saṁvat 1765, in the *dark fortnight* of the month of *Mārgaśirṣa*, on the *7th tithi* which was a Monday (day of *Candra*)[2].

The Hijra year (*1065*) was completed on *20th October 1655*[3] and hence we must infer that the work was composed subsequent to this date. Dara was born on *29 Safar* 1024 A. H. (*20th March 1615 A. D.*)[4] According to the method of calculating age in Hijra years then current, he completed his 41st year on *28th Safar 1065* (28th December 1654.) He was *41 years and 10th months old* when the Hijra year *1065* ended (last day of Zilaija)

1. Compare the following Colophon of *Majma '-ul-Baḥrain* "Praise be God for his favours, who granted me the grace of completing this tract, entitled *Majma '-ul-Baḥrain* in the year 1065 A. H. which corresponds to the forty-second year of the age of this unafflicted and unsorrowing Fakīr, Muḥammad Dārā Shikūh" (Vide p. 75 of the edition of *Majma-ul-Baḥrain* by M. Mahfuz-ul-Haq--*Bib. Indica* No. 246, 1929).

2. This date is equivalent to *23rd November 1708* (Vide p, 219 of *Indian Ephemeris*, Vol. VI),

3. Vide p. 113 of *Indian Ephemeris* Vol. VI.

4. Vide p. 117 of Beal's *Ori. Bio. Dictionary*.

on *28th October 1655*. As he had not completed his 42nd year when the *Samudra-Saṅgama* was composed we must infer that this work was composed between *21st October* (1st Moharam 1066) and *17th December 1655* (28 Safar 1066 A. H.) the date of Dārā's completion of his 42nd year.[1]

The foregoing details of the chronology of Dārā's present work are in harmony with the following facts about his life and his contact with Benares Paṇḍits as known to contemporary authors :—

(1) Bernier[2] in his letter dated *4th October 1667* from Chiras in Persia to Monsieur Chapelain refers to Dārā's heresy as follows :—

"In conclusion I shall explain to you the *Mysticism* of a *Great Sect* which has latterly made great noise in *Hindoustan* in as much as certain *Pendets* or *Gentile Doctors* had instilled it into the minds of *Dara* and *Sultan Sujah*, the elder sons of *Chah-Jehan*."

(2) Dara when Governor or Viceroy of Benares in **1656** caused a Persian translation to be made from the Sanskrit texts of the *Upanishads*. This translation was made by a large staff of Benares Paṇḍits. It has been

---

1. I am thankful to my friend Mr. V. S. Bendre for the verification of these chronological details.

2. Vide p. 345 of *Bernier's Travels* (Constable, 1891)—The Editor quotes a passage regarding Dara's heresy from *Alamgīr Nāmā* written in A. D. 1688 by Mirza Muhammad Kazīm :—"He (Dara) was constantly in the society of *Brāhmans*, *Jogis*, and *Sanyāsīs* ...... He was under such delusion about this *Bed* that he collected *Brāhmanas* and *Sannyāsīs* from all parts of the country, and paying them great respect and attention, he employed them in translating the *Bed*".

rendered into Latin by Anquetil—Duperron and published by him at Paris in 1801.[1]

(3) Bernier makes the following remarks about Dārā elsewhere[2] in his travels :—

"Born a *Mahomedan*, he continued to join in the exercises of that religion; but although thus publicly professing his adherence to its faith, *Dara* was in private a *Gentile* with *Gentiles* and a *Christian* with *Christians*. He had constantly about him some of the *Pendets* or Gentile Doctors on whom he bestowed large pensions and from these it is thought he imbibed opinions in no wise accordant with the religion of the land etc.

(4) I have suggested in my paper[3] on "Bernier and Kavīndrācārya Sarasvatī at the Mughal Court" that "one of the most celebrated Pendets in all the Indies who had formerly belonged to the household of *Dara*" was identical with Kavīndrācārya Sarasvatī, who after Dārā's murder in A.D. 1659 was taken into service by *Danechmand-*

1. Vide footnote 3 on p. 323 of *Bernier's Travels* Duperron's version is criticised in the *Edinburgh Review* (Jan. 1803) by Alexander Hamilton, who was in India and who later was Professor of Sanskrit in the East India College at Haileybury. Hamilton pays a glowing tribute to Dara's abilities.

On p. 592 of Elphinstone's *History of India* (1874) it is stated that "Dara had written a book to reconcile the Hindu and Mahometan Doctrines". Cowell in his footnote on this page states that the Persian translation of the Upanishads made by Dara's order was finished in Ramazān A. H. 1067 (A. D. 1657). He also invites our attention to "the account of *Nādir-un-nikāt* or Seven days' dialogue between the prince and Bābā Lāl in Wilson's *Hindu Sects* (*Collected Works* Vol. I, p. 348). Evidently this *Bābā Lāl* is the same as his name-sake referred to in the समुद्रसंगम.

2. Vide p. 6 of *Travels*.

3. Vide pp. 1–16 of *Annals* of S. V. Ori. Institute, Tirupati Vol. I, Part 4 (1940).

*kan*, the patron of Bernier himself. Kavīndrācārya's contact with Dara before A. D. 1659 may have been responsible for the production of such works like *Samudra-saṅgama* in A. D. 1655 about which year Dara caused a Persian translation of the Upanishads to be made from the Sanskrit original.

(5) Another noted *Sanyasī* revered by *Dara* was Gosvāmi Nṛsiṁhāśrama. Dr. C. K. Raja recently published a Sanskrit letter[1] of *Dara* addressed to this *Sanyāsi*. I have proved in a special paper[2] that this *Sanyāsi* was identical with Brahmendra Sarasvatī, who is a signatory to a *Nirṇayapatra* drawn up at Benares in A. D. 1657.

(6) In a Hindī work called the कवींद्रकल्पलता represented by a MS[3] in the Anup Sanskrit Library, Bikaner there is a Section[4] containing *Dohas* in praise of Dara Shukoh. This work was recently brought to my notice by Prof. Dasharatha Sharma of Bikaner. Its author is no other than Kavīndrạcārya Sarasvatī who held much influence over Emperor Shah Jahan, to whose praise he devotes a

---

1. Vide *Adyar Library Bulletin* Vol. IV, October 1940 and VII, October 1943 ( Trans. ).

2. Vide pp. 172–177 of *Adyar Library Bulletin* Vol. VI, p. 13 ( 1942 ).

3. I am thankful to Prof. Dasharatha Sharma for keeping at my disposal his own copy of the Bikaner MS. of the *Kavīndra-kalpalatā*.

4. This Section begins :—

" अथ **दारासाहिके** कवित्वतरलता नरनारी तनमन फूलत है etc. "

The Section ends :—

" इति श्रीसर्वविद्यानिधानकवीन्द्राचार्यसरस्वतीविरचितायां कल्पलतायां दारा-साहिविषयक ध्रुपदं दोहाकवित्वानि । "

**This Section comprises folios 26 to 30 of my copy of the above MS.**

